भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ८५

# ऐतिहासिक संकीर्ण साहित्य

## खंड ८ वा

संपादक

म. म. द. वा. पोतदार

कार्याध्यक्ष, भा. इ. सं. मंडळ, पुणें



शक १८७५ ] किंमत तीन रुपये [ इ. स. १९५३

# निवेदन

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें म. म. प्रा. दत्तो वामन पोतदार यांच्या खाजगींतील मोठ्या संग्रहांतील ऐतिहासिक कागदपत्रांचा भाग, केवळ वानगीदाखल सभासदांच्या हातीं देतांना आज आम्हांस आनंद होत आहे. आजपर्यंत स्वतः चिटणीस असतांना स्वतःचा ग्रंथ भा. इ. सं. मंडळाच्या स्वीय मालेंत घालतां आला असता; परंतु इतरांची सोय करण्यासाठीं असें केलें, असा खुलासा प्रस्तावनेंत त्यानीं केलेला आहेच. तो त्यांच्या सौजन्याचाच द्योतक आहे. आजपर्यंत आम्हां सर्वांचे ग्रंथ मंडळाच्या स्वीय मालेंत प्रसिद्ध झाले. परंतु जवळजवळ मंडळाच्या सुरुवातीपासून ज्यांनीं त्याची धुरा मोठ्या जबाबदारीनें स्वशिरावर वाहिली व त्याला महत्वाचें स्थान प्राप्त करून दिलें त्या प्रा. पोतदारांच्या नांवावर ऐतिहासिक कागदपत्रांचा एकही ग्रंथ नसावा याबद्दल आम्हां सर्वांच्या मनाला एकसारखी टोचणी लागून राहिली होती. कित्येक दिवस असेच गेल्यावर या प्रश्नाचा निकाल करावा असें मनानें ठरवून, प्रा. पोतदारांजवळ त्याबद्दल बोलणीं सुरू करून थोडी प्रेमळ जबरदस्तीहि करण्याचें ठरविलें व उद्योगास लागलों. आनंदाची गोष्ट कीं, मोठ्या अगत्यानें व आत्मिक भावनेनें त्यांनीं ती करून घेतलीहि. त्याचेंच फळ म्हणजे आजचा हा छोटेखानी ग्रंथ होय. तो आज प्रसिद्ध झाल्यानें आमच्याप्रमाणेंच इतरांसहि आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं याची आम्हांस खात्री वाटते. मंडळाची आर्थिक परिस्थिति भक्कम असती तर हा ग्रंथ चारपांचशें पानांचाहि काढतां आला असता; परंतु ती तशी नसल्यानें या छोटेखानी ग्रंथावरच आपणांस राजी रहावें लागत आहे. थोडी अनुकूलता प्राप्त झाली किंवा एखादा धनिक प्रसन्न झाला तर प्रा. पोतदारांजवळील बहुमोल कागदपत्रें उजेडांत आणण्याची उमेद बाळगून आम्ही आहोंत. तो उजाडेल तो सुदिन होय. या प्रसंगीं वाईट इतकेंच वाटतें कीं, संभाजीचें दानपत्रहि याच वेळीं छापून सभासदांच्या हातीं देण्याचा संकल्प आम्ही मागील खेपेस जाहीर केला होता, तो आम्हांस पुरा करतां आला नाहीं. एका धनिकानें त्याकरितां पैसे देण्याचें कबूल केलें आहे, त्या वेळीं तें दानपत्र प्रसिद्ध करण्याचें प्रा. पोतदारांनीं कबूल केलें आहे. त्या दिवसाकडेही आम्ही मोठ्या आशेनें पहात आहोंत.

प्रस्तुतच्या ग्रंथांतील कागदपत्रांसंबंधीं महत्त्वाची चर्चा संपादकांनीं आपल्या प्रस्तावनेंत केलेलीच आहे. तथापि या ग्रंथांत कांहीं नामनुद्रा प्रथम प्रसिद्ध होत असाव्या असें वाटतें, तरी अभ्यासकांनीं त्यांकडे जरा जास्त बारकाईनें लक्ष द्यावें, अशी त्यांस विनंति आहे.

मंडळाची आर्थिक स्थिति अत्यंत ओढग्रस्तीची असल्यानें प्रकाशनकार्य व्हावें तितकें भरघोस होऊं शकत नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. वर्षांतून निदान दोन अंक तरी सभासदांचे हातीं देतां यावेत अशी आम्ही सदैव खटपट करीत असतों. मुंबई सरकारची दरसाल मिळणारी आर्थिक मदत वाढवून मिळावी, भारत सरकारकडून मदत मिळावी



श्री

# प्रस्तावना



( i ) एक दासोपंत–देवधर कागदांचा भुंडा संग्रह सोडला तर, माझ्या नांवें प्रसिद्ध होणारा ऐतिहासिक साधनांचा असा हा पहिलाच स्वतंत्र खंड होय. हा प्रसिद्ध होण्याचा योग अचानकपणेंच आला. आला म्हणण्यापेक्षां कांहीशा गोड बळजबरीनें आणला गेला. कसा तें सांगण्यासाठीं थोडा रहस्यभेद केला पाहिजे.

( ii ) गेल्या तीसपस्तीस वर्षांत अधूनमधून अनेक दफ्तरें चाळण्याचा योग मला आला. हातीं आले त्यापैकीं कित्येक कागदपत्र स्फुटरूपानें भा. इ. सं. मंडळाचे द्वारां वेळोवेळीं प्रसिद्ध केलेले आहेत. ज्यांतून स्वतंत्र खंड प्रसिद्ध होऊं शकतील अशी सामग्री संग्रहीं नाहीं किंवा नव्हती असेंहि मला म्हणतां येणार नाहीं. परंतु अनेक संशोधकमित्रांजवळील महत्त्वाचीं कागदपत्रें कशीं प्रसिद्ध होतील याचीच चिंता वाहत असतां त्यांचीच भरपूर सोय आपणांस करितां येत नाहीं याचीच खंत मनांत प्रबळ राहिल्यानें स्वकीय संग्रहप्रसिद्धीचा विषय मागें राहात गेला.

( iii ) शिवाय जेव्हां केव्हां स्वकीय संग्रह प्रसिद्ध करण्याचा योग येईल त्यावेळीं कित्येक नवीन कल्पना अंमलांत आणण्याचाहि विचार मनांत जागरूक होता. पैकीं एक कल्पना अशी. ज्यापक्षीं उपलब्ध होणाऱ्या कागदपत्रांत मोडी लिपींत लिहिलेले दपत्रच या देशभागांत अधिक संख्येनें उपलब्ध होतात त्यापक्षीं मूळ मोडी कागद **डी लिपींतच प्रसिद्ध करणें** अधिक शास्त्रशुद्ध समजलें पाहिजे. घटकाभर हें कबूल केलें तरी ही कल्पना प्रत्यक्षांत आणण्याला अनेक अडचणी होत्या. रूढसांप्रदाया-रुद्ध म्हणून या कल्पनेचें हार्दिक स्वागत होण्याचा संभव अगदीं अल्पच असणार हें सांगण्यास कोणी ज्योतिषी नको. मोडी छपाई ठशांत करावी तर त्या सोयी कोठें उपलब्ध आहेत ? शिळाछापाचा आश्रय करून हें काम उरकावें लागेल. शिवाय मोडी लिपींतील साहित्य वाचणारे या युगांत, कीं ज्यांत मोडी लिपि मोडीला टाकली आहे, कोठें भेटणार ? काळजीनें काम केलें तर मूळच्या मोडी नकला शिळेवर घालतांना त्यांचें रूप मुळाशीं मिळतें राखण्यांत साहजिकच अधिक यश लाभावें. पण असे दर्दी नकलनवीस आज कोठें पाहावे ? इतकें सर्व मला स्पष्ट दिसत आहे पण अद्यापि ती कल्पना कांही मी सोडली नाही. केव्हां तरी तसा प्रयोग यशस्वी करून दाखविण्याची उमेद मी सोडलेली नाही. त्याबरोबर हें मी जाणून आहे कीं हा प्रयोग मला स्वबळावरच करावा लागेल. कोणी संगतसोबत देईल ही आशा दुराशाच ठरेल. अशा प्रयोगासाठीं आपला हातचा संग्रहच उपयोगी पडणार हें उघड आहे.

iv मोडी लिपींत मोडी कागद छापावे हा एक आग्रह झाला. असाच दुसरा आग्रह पोटीं होता. तो असा कीं, आमच्या इकडे जे कागदपत्र आजवर प्रसिद्ध झाले त्यांवर कारकून, सरकारकून, देशमुख-देशपांडे, छत्रपती इत्यादिकांच्या मुद्रा असतात. या मुद्रांतील अक्षरें ओळीला ओळ ठेवून आणि मुद्रेचा गोल, लंबवर्तुळ, षट्कोनी, दुपदरी, तिपदरी वगैरे स्वरूपदर्शक आकार यावच्छक्य उठवून या मुद्रा कागदांसमवेत छापण्याचा रूढ सांप्रदाय आहे. नीट विचार केला असतां दिसून येईल कीं या मुद्रा अनेक कागदांत पुनरावृत्त होतात. एकाच नांवाची मूळ मुद्रा झिजली, किंवा निकामी झाली किंवा अशाच कांहीं कारणास्तव, नवी होते. त्याच व्यक्तीचें पद बदललें तरीहि त्यास नवी मुद्रा करावी लागते. लेखावरील मुद्रा ही त्याच्या प्रामाण्याची रेखा होय. लेखाच्या अधिकृतत्वाविषयीं आणि सत्यत्त्वाविषयीं मुद्रा प्रमाण पुरविते. मुद्रेचें प्रामाण्य ठरवितांना तिचा आकार, अक्षरवटिका तपासण्यासाठीं यथावत् रूपानें अभ्यासकाच्या चिकित्सेसाठीं ती उपलब्ध होणें अवश्य आहे. या प्रकरणांतील शेकडों वारकाव्यांचा प्रपंच तज्ज्ञ जाणतात. छापल्या जाणाऱ्या प्रत्येक लेखाबाबत अपेक्षित रूपांत या मुद्रा–मोर्तबांलाहि हें विवेचन लागू आहे–उपलब्ध करून देणें अशक्य नसलें तरी सुलभ तर निःसंशय नाहीं. यास्तव माझी कल्पना अशी आहे कीं प्रमाणमुद्रांचे अगदीं यथावत् स्वरूपांत एकत्र मुद्रण स्वतंत्रपणें करून घ्यावें. आकारमान व स्वरूप यांविषयीं सविस्तर वर्णन त्यालगत देऊन टाकावें. अशा प्रमाणमुद्रासंग्रहांतील प्रत्येक मुद्रेस निश्चित क्रमसंख्या द्यावी. एवढें काम सिद्ध करावें आणि तसें झाल्यावर कागदपत्र छापतांना आपल्या समोरील मूळ कागदांवरील मुद्रा या प्रमाणमुद्रासंग्रहांतील अधिकृत मुद्रारूपाशीं ताडून पाहावी आणि नेमक्या स्थळीं मुद्रा सांप्रतप्रमाणें न छापतांना केवळ **प्रमाणमुद्रासंग्रहांतील** आवश्यक क्रमांक निर्दिष्ट करावा. असें होईल तर शास्त्रशुद्धता व प्रामाण्याला बळकटी येईल आणि वारंवार बेडौलपणें आणि अशास्त्रीयपणें त्याच त्याच मुद्रा वारंवार छापत बसण्याचे श्रम वांचतील. इतकेंच नव्हे, तर या मुद्रांच्या छपाईसाठीं आज खर्ची पडणारी जागाहि वांचून छपाईचा खर्च पुष्कळ कमी होईल.

मराठी राज्यांतील सोन्याचांदीच्या अनेक अस्सल मुद्रा कांहीं योगायोगानें मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या संग्रहीं प्रत्यक्ष आहेत. हा संग्रह अत्यंत बहुमोल समजला पाहिजे. जगांत अन्यत्र हा कोठेंहि मिळणार नाहीं. ही या संग्रहाची अपूर्वता जाणून माझे उद्योगी संशोधक मित्र श्री. वासुदेव सीताराम बेंद्रे यांनी या मुद्रा यथाप्रति युक्तीनें सिद्ध करून त्यांजविषयीं विवेचन व वर्णन करणारा एक इंग्रजी प्रबंध तयार करून ठेवल्याला आज कित्येक वर्षें झालीं. हा प्रबंध प्रसिद्ध होता आणि मी म्हणतों तसे सर्वमान्य क्रमांक त्यांत दिले असते तर माझी मुद्राप्रामाण्यपरीक्षणाची आणि मुद्रामुद्रणाची वरील कल्पना पुष्कळ अंशानें सिद्धीस गेली असती. स्वतः रॉ. ए. सोसायटी किंवा मुंबई सरकार, वा मुंबई विद्यापीठ, वा पुणें विद्यापीठ म्हणा, नाहींतर आमचें

भा. इ. सं. मंडळ यांनीं कोणीतरी हा वेंद्रे–प्रबंध होईल तितक्या लवकर प्रसिद्ध केला पाहिजे. वरील संग्रहांत नसलेल्या मुद्रांची जोड अस्सल कागदपत्रांवरून देऊन या उद्योगास परिपूर्णता आणली पाहिजे.

यांतील आज तरी कांहींच सिद्ध नाहीं. अलीकडे पुण्यास तेथील जिल्हा सहकारी खरेदी–विक्रीसंघानें शालेय विद्यार्थ्यांसाठीं कांहीं नवीन वह्या छापून प्रसिद्ध केल्या आहेत. यांतील एका वहीची संपूर्ण सजावट आम्ही करून दिली. त्या वहीवर पांच मुद्रांचा एक संच वरील सहकारी संघाच्या कृपेनें आम्ही मूळ कागदपत्रांतील अस्सल मुद्रांवरून **यथावत्** उतरून मुद्रित केला आहे. या पंचमुद्रासंचाचें येथें नमुन्यासाठीं वरील संघाच्या कृपेनें पुनर्मुद्रण केलें आहे. वर वर्णन केल्याप्रमाणें मी कल्पनातरंगांत दंग असतां दुसरीकडे भा. इ. सं. मं. तील माझे प्रेमळ सहकारी यांनीं माझ्या संग्रहांतील कागदपत्रांचा खंड प्रसिद्ध करण्याची तांतडीची आज्ञा फर्माविली ! तांतडी आणि मी यांचें क्वचित्‌च सूत जमलें आहे !! पण करणार काय ? नुकताच महाबळेश्वरींहून आलों होतों; तेथें माझे मित्र श्री. पंडित दिनकर केशव कानेटकर यांनी मिस् रॉजर्स् यांचे मार्फत मिशनेरी मंडळींना मराठी इतिहास व मराठी साहित्य यांचा परिचय करून देणारीं माझीं सहा व्याख्यानें इंग्रजींत करविण्याची योजना पार पाडली ! पंडित कानेटकर धार्मिक वृत्तीचे आणि विशेषत: श्रीसमर्थ संप्रदायाचे भक्त आहेत. त्यांनी श्रीक्षेत्र महाबळेश्वर येथील समर्थशिष्य दिवाकर गोसावी यांचे वंशज श्री. दत्तुबोवा यांचेकडे मला नेलें. या उभयतांचे कृपेनें दिवाकर गोसावी मठांतील कांहीं जुने कागदपत्र माझ्या हातीं आले. दिवाकर गोसावी समर्थ–शिष्यांत राजकारणी म्हणून प्रसिद्ध. त्यांचा मठ श्रीक्षेत्र महाबळेश्वरासारख्या प्रसिद्ध स्थळीं ! तथापि साक्षात् त्या मठांतील कागदपत्र साक्षेपी समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांच्याहि हातीं लागले नाहींत. तें भाग्य पंडित कानेटकरांच्या कृपेनें मला लाभलें आणि आज भा. इ. सं. मंडळास त्याच्या प्रसिद्धीचें अपूर्व श्रेय प्राप्त होत आहे ! भा. इ. सं. मंडळाच्या आज्ञेला हें साहित्य मी तोंडी दिलें ! मंडळाचे एक चिटणीस माझे मित्र श्री. वि. सि. चितळे यांनीं लगोलग लेखकाची भूमिका आनंदानें पत्करिली. वाचन मी सांगत गेलों, त्यांनीं उतारा केला. आमचे श्री. शंकरराव जोशी यांनीं कालनिर्देश काढून घातले. लगोलग छपाई सुरू झाली, तेव्हां तांतडीचा तडाखा माझे ध्यानीं आला ! पण सुटकेची सोयच नव्हती ! तेव्हां मग माझे वरील कल्पनातरंग निवेदनापुरतेच राहिले !

माझे दुसरे प्रेमळ इतिहासप्रेमी मित्र श्री. बाळासाहेब घोरपडे यांनीं कित्येक वर्षांपूर्वी खळदबेलसरच्या गरुड घराण्यांतील कागदांचा एक रुमाल माझे स्वाधीन केला. ते प्रसिद्धीचा तगादा करीतच होते. परंतु भा. इ. सं. मंडळावर हा बोजा टाकण्यास मन संकोचत होतें. तेव्हां त्या संग्रहांतील कित्येक निवडक कागदांची भर श्री. चितळे

यांचेपुढें टाकली! त्यांवरही संस्कार होऊन त्यांची सोय आमच्या उभयतांचे विचारें लागली.

गेल्या दोनतीन वर्षांत पंढरपूरकर मंडळींनीं मला निरनिराळ्या निमित्तानें पाचारण केलें! एवढें श्रीक्षेत्रपंढरपूर! आमच्या महाराष्ट्राचें एक आद्यपीठ! परंतु येथील टाळ-वीणा मृदंगांच्या ध्वनींच्या दुमदुमत्या घोषांत आमच्या इतिहाससंशोधनाच्या टिमकीचा आवाजच कोठें ऐकूं येईना. तेव्हां आमचे मित्र सद्भक्त श्री. भा. पां. बहिरट, देशभक्त श्री. ग. वि. ऊर्फ बाबूराव जोशी प्रभृति मंडळीपुढें गाऱ्हाणें मांडलें! पंढरपूरकर जनतेची सभेंत कांहीं विनवणी, कांहीं कानउघाडणी, केली! त्याचा परिणाम होऊन पंढरपूर संशोधन मंडळाच्या रूपानें उद्योगास प्रारंभ झाला! एका प्रसंगीं श्रीविठ्ठल-रुक्मिणीच्या अधिकाऱ्यांनीं सत्कार करून ताटभर पेढ्यांचा प्रसाद पुढें केला! त्याचा स्वीकार तर नम्रपणें केला! पण तुकोबांची आठवण झाली आणि म्हणालों, 'हा प्रसाद तर वंद्यच आहे; पण आमच्यासारख्याला ताटभर पेढे कशाला! कांहीं जुन्या कागदांची भिक्षा पांडुरंग केव्हां घालणार?' आश्चर्य हें कीं, त्याच बैठकींत पांडुरंगाच्या प्रेरणेनेंच नव्हे तर काय, तीन जीर्ण फर्मानें श्री. आबाजी वडवे यांनीं खिशांतून पुढें काढून चकित आणि पुलकित केलें! प्रारंभ तर उत्तम झाला, हळूहळू श्री. बहिरट यांनीं हरिदास घराण्यांतील श्री. माधवराव रामचंद्र हरिदास यांच्याकडील कागद आणून दिले! पाहतों तों शके १५८५ तील कोणा कृष्णाजी मंबाजी या हरिभक्तानें स्वहस्तानें आपल्या शिष्य मंडळीस,—ते कथेंत मागें उभे राहात—कथा करून दिली! कागद बघण्यासारखा आहे म्हणून त्याची प्रतिमा या खंडांत जोडली आहे. एवढा हा हरिभक्त कृष्णाजी मंबाजी कोण ही जिज्ञासा बळावली! मग तीं प्रथम मिळालेलीं तीन फारसी फर्मानें अत्यंत जीर्ण होतीं तीं दिल्लीच्या भारतीय दप्तरखात्याचे कृपेनें कवचान्वित करून आणलीं होतीं तीं वाचून पाहतां त्यांचाहि संबंध कृष्णाजी मंबाजीशींच पोंचला! मग या संग्रहांत छापलेला ले. ६६ हातीं आला त्यावरून स्पष्टच झालें कीं हा पुरुष इनामदार असून पालखीचा मान उपभोगीत होता!

पंढरपुरीं बहिरट यांचे द्वारा शोध चालूच ठेविला आहे. कृष्णाजी मंबाजीची समाधि पंढरपुरांतच होती. ती आतां पडून साफ झाली आहे. तिचा जीर्णोद्धार करण्याचें हरिदासमंडळींचें मानस ऐकण्यांत आलें. रा. बहिरट ता. १९।१।५२ च्या पत्रांत पुढील माहिती कळवितात:—

"हरिदासांचे मूळ पूर्वज रामा हरिदास हे होते. त्यांचे नंतर बऱ्याच पिढ्यानंतर पांडुरंग गोविंद हे भगवद्भक्त सत्पुरुष होऊन गेले. यांचे बंधु विनायक. लागू पुरती वंशावळ (संपूर्ण वंशावळच मिळून सिद्ध होणें अवश्य):—




*माधव ( विद्यमान* यांचेकडूनच हरिदास संग्रहांतील कागद मिळाले. )

पांडुरंगबुवा यांना प्रत्यक्ष पांडुरंगानें काष्ठाच्या पादुका प्रसाद म्हणून दिल्या त्या त्यांचे घराण्यांत असून हल्ली त्या पादुकांवर चांदीचें कवच करून पादुका संरक्षित आहेत आषाढ वद्य १ व कार्तिक वद्य १ या दोन दिवशीं सदरच्या पादुका त्यांच्या घरांतील वडील पुरुषाच्या मस्तकावर पागोट्यानें बांधून श्रीपांडुरंगाचे देवळांत जाऊन त्या ठिकाणीं काला दहिहंडी होऊन उत्सव होतो. नंतर ही पादुकांची मिरवणूक महाद्वारांतून घाटावरून चंद्रभागेच्या तीरीं जाऊन पाणी सिंचन करून नंतर खाजगीवाल्यांचे वाड्यांत जाऊन नंतर घरीं परत जातात. परत आलेवर डोकीवरील पादुकांची आरती होते. नंतर पादुका काढतात. सदर प्रसंगी पादुका डोकीवर असेतों तो मनुष्य बेभान स्थितींत असतो. ते दिवशीं अभिषेक ब्राह्मणभोजन होते. पुढें आठ दिवस म्हणजे द्वितीये-पासून नवमीपर्यंत त्या पादुकासमोर निरनिराळ्या कथेकऱ्यांचीं कीर्तनें होतात. हा कार्यक्रम हरिदासांचे वाड्यांत होतो.

या शिवाय पांडुरंगाचे देवालयाचे सभामंडपांत आषाढ शु. १ ते शुा १० व कार्तिक शुा १ ते १० आणि रामकृष्ण देवांच्या जयंत्या अशीं कीर्तनें हरिदासांच्या घराण्यांतील इसमांचीं होतात. अशी पूर्वापार पद्धत आहे.

पांडुरंगबुवा यांच्या नक्त नेमणुका व इनाम जमिनी ठिकठिकाणच्या मिळाल्या त्या अद्यापि त्यांचे वंशांत चालू आहेत. सेगांवची नक्त नेमणूक......दरसाल सरकारी तिजोरींतून १९८ रु. मिळतात.

हरिदासांचे पांडुरंगबुवांचे वंशांत चालू इनामें:--

( i ) चरमलवाडी ( ता. खटाव जि. सातारा )- हा गांव संपूर्ण इनाम

( ii ) आंधळगांव ( ता. सांगोला जि. सोलापूर ) – संपूर्ण गांव इनाम

( iii, iv–v, vi ) अरण ( ता. मोडनिंब ) आढिव, भटुंबरे, सेगांव–नक्त नेमणुका

( vii ) इनाम जमिनी – अरण, आढिव, भटुंबरे देगांव, सिरढोण, चरमलवाडी मुंडेवाडी इ.

हरिदासांचें गोत्र शांडिल्य, शाखा माध्यंदिन, यजुर्वेदी. हरिदासांची पंढरपुरांत६०।६५ घरें आहेत." याप्रमाणें श्री. बहिरट यांना प्रश्न विचारल्यावरून त्यांनीं तत्परतेनें चौकशी करून माहिती कळविली तिचा संग्रह उपयुक्त जाणून केला आहे. एक पंढरपूर संशोधनमंडळच स्थापण्याइतकें काम तिकडे करण्यास वाव आहे म्हणून आम्ही श्री. बहिरट यांच्याच गळीं पडलों. त्यांनीं या कामीं परिश्रम करून उद्योगाला प्रारंभहि केलेला आहे. त्यांनीं आमच्या सूचनेप्रमाणें स्वतंत्र प्रकाशनेंहि करावयास हवींत. या खंडांत कांहीं थोड्याच कागदांचा संग्रह करणें शक्य झालें.

असो ! शके १५८५ त कृष्णाजी मंबाजी यानें आपले ' सिष संतान '– शिष्य मंडळी– ' स्नेहेकरी ', ' समस्त हरिदास ' होते, त्यांतून ' पांडुरंग व विनायक ' यांस आपल्या प्रतिपदेच्या कथेचा अधिकार दिला. श्री. बहिरट यांनीं दिलेल्या माहितीवरून तोच अधिकार अद्यापिवरी हरिदासमंडळीकडे चालू असावा असें दिसतें. हरिदासांची लागूपुरती जी वंशावळ वर दिलेली आहे तींत विद्यमान माधवराव ( १५८५ च्या कागदाचे धनी ) यांचेपासून वरचा आठवा पूर्वज **पांडुरंग गोविंद** हा येतो. सरासरी दरपिढीस २५ वर्षे धरण्याचा आमचा शास्त्रसंप्रदाय अनुभवसिद्ध आहे. त्याप्रमाणें पाहतां माधवराव सुद्धा नऊ पुरुष धरून २२५ वर्षें सुमारें होतात. आज शके १८७५; म्हणजे १५८५ पासून आज २९० वर्षें होतात. अशी सुमारें ६५ वर्षांची तफावत पडते. घराणें दीर्घायुषी धरलें तर तिसाची पिढी धरून हिशेब जुळता करून घेतां येण्यासारखा आहे. कृष्णाजी मंबाजी १५८५ तील पत्र स्वहस्तें **'चिरंजीव पांडुरंग व विनायेकांस'** लिहितो. मिळालेल्या वंशावळीवरून पांडुरंग व विनायक हे दोघे बंधु असून ते गोविंद मेघश्यामचे पुत्र होत असें निष्पन्न होत आहे. कृष्णाजी मंबाजीनें पत्राचे डोक्यावर जो तिरपा मजकूर लिहिला आहे त्यांत ' गोविंदाच्या मुलाचा ' सांभाळ करण्याविषयीं तो इष्टजन, मैत्र, सोयरेधायरे यास गळ घालून सांगत आहे. तसें केल्यानें ' तें मज पावेल ' ही ग्वाहीहि तो देत आहे. उघड झालें कीं गोविंदाचा मूल म्हणजेच पांडुरंग होय. आणि

आपली वंशावळहि बरोबर तसेंच सांगते. अर्थात् शके १५८५ त कृष्णाजी मंचाजीनें पांडुरंग गोविंद हरीदास यास आपली कथा दिली आणि त्याची सोंपवण आपल्या लेक –पुतन्या–इष्टजनादिकांकडे केली. प्रस्तुत पंढरपुरास हरिदासवेस असून बडवे महाजन पंचमंडळींच्या घरांजवळच हरिदासांचीं घरेंहि उभीं आहेत. असें हें हरिदास घराणं भगवद्-भक्तांचे, शिवाजी महाराजांच्या काळचें किंवा त्यापूर्वीपासून पंढरपुरीं नांदणारे महत्त्वाचें व प्रसिद्ध होय.

कृष्णाजी मंचाजीबाबत अधिक शोध व्हावयास पाहिजे. या संग्रहांत छापलेल्या ले. ६६ वरून त्याकडे मगूर येथें पालकीची तैनात होती. इतर कांहीं कागदांवरून सिराढोणशींहि त्याचा संबंध पोंचतों. सिराढोणला हरिदासांना इनामें चालतात. असा कृष्णाजी मंचाजी आणि हरिदास यांचा दृढ संबंध आहे. कृष्णाजी मंचाजीच्या घराण्याचा शोध आपुटगी, मगूर, सिरेढोण वगैरे गांवांकडे केला पाहिजे. आपुटगी वगैरे गांवें इंडी तालुक्यांत पंढरपूर ते इंडी मार्गालगत आहेत. कृष्णाजी मंचाजी यांचें आडनांव खटावकर अगर माडगूळकर असावें अशी अटकळ हरिदासघराण्यांतील कांहीं व्यवहारांवरून श्री. चहिरे यांनीं कळविली आहे. त्याबाबत अधिक शोध चालू आहे.

कृष्णाजी मंचाजी यांनीं १५८५ शकेंत स्वहस्तें निरवानिरव केली. त्या महत्त्वाच्या कागदावरील सह्यांकडे जरा लक्ष दिलें तर त्यांत दोन अधिकाऱ्यांच्या फार्सी मोहोरेनिशीं सह्या आहेत. एक विसाजी गोविंद हा क्षेत्र पंढपूरचा ठाणेदार आहे; आणि दुसरा (त्याचा भाऊ !) त्रिंबक गोविंद. त्रिंबक गोविंद हा '**कमाविसदार जात्रा क्षेत्र मजकूर**' असा हुद्दा लावतो, त्यावरून या काळीं पंढरपुरास यात्रा रूढ असून त्या **यात्रेसाठीं स्वतंत्र कमाविसदाराची** नेमणूक होती हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. तसेंच दुसरी ध्यानांत ठेवण्यासारखी सही **पांडुरंग** (पाडरूग) **नामदास** ही होय. नामदास मंडळी पंढरींत सांप्रत विद्यमान आहेत. त्यांशीं यांचा कांहीं संबंध जुळेल किंवा कसें याचा विचार व शोध करण्यासारखा आहे. नामदेव–संशोधकांना ही सही विचार करावयास लावील यांत शंका नाही. आज शके १५८५ च्या एका अस्सल कागदावर 'नामदास' नांवानें पांडुरंग नामदास याणें केलेली सही साक्षात् पुढें येत आहे ही शोध-प्रवर्तक बाब ठरणार यांत शंका नाहीं. किंबहुना अगदी निरपवाद अस्सल अशा कागदा-वरील 'नामदास' हीं सुमारें तीनशें वर्षांपूर्वीचीं अक्षरें यापूर्वी अन्यत्र कोठें प्रसिद्ध झालेलीं आमच्या पहाण्यांत नाहींत.

अशीच किंबहुना याहीपेक्षां शोधप्रवर्तक एक सही या कागदावर आम्हांला वाटते ती '**बाबा नित्यानंद**' ही होय. हे बाबा नित्यानंद कोण असावे ? 'नित्यानंदैक्य-दीपिका'कार शिवकल्याण यांनी आपली दशमावरील टीका श्रीक्षेत्र पंढरपूर येथें संपविली. नित्यानंदैक्यदीपिका टीका शके १५५७ त पूर्ण झाली. नित्यानंद हेच त्रिमल या नांवानें शिवकल्याणांचे पिते आणि नित्यानंद या चतुर्थाश्रमी नांवानें गुरु. पंढरपुराशीं

नित्यानंद आणि शिवकल्याणांचा स्पष्ट संबंध आपणांस आढळून येतो. तेव्हां असा बळकट तर्क संभवतो कीं या शके १५८५ च्या पत्रावर **स्वहस्त करणारे 'बावा नित्यानंद' ते हेच शिवकाल्याणांचे पिते-गुरु नित्यानंद होत.** नित्यानंदांचा साक्षात्काल आपणांस उपलब्ध नाहीं. तथापि शिवकल्याणांची नि०दीपिका १५५७ तली आहे. तेव्हां हा तर्क संभाव्य कोटींतला ठरण्यास अडचण येणार नाहीं. नित्यानंद १५८५ त बरेच वृद्ध-सुमारें ७० वर्षांचे-असावेत आणि त्यांनीं वयाच्या चाळिशींत चतुर्थाश्रम स्वीकारला असावा. याचा मेळ तर्कानें असा:- नित्यानंद (त्रिमल) जन्म अजमासें शके १५१०; संन्यास सु. शके १५४०; समाधि अनुमानें शके १५९०, ऐशींव्या वर्षी. या हिशेबानें शिवकल्याण जन्म शके १५३०, नि०दी० १५५७; दशम टीका १५८०; प्रयाण १६००. ले. ६८ हा शके १५९० मधील आहे. त्यांत कृष्णाजी मंबाजी यांनीं हाली **'सनेस'**- म्हणजे संन्यास- घेतल्याचा स्पष्ट निर्देश आहे. १५८५ वाराणसीस जाण्याची इच्छा कृष्णाजि व्यक्त करितो. तेव्हां १५८५ ते १५९० च्या दरम्यान त्यानें संन्यास घेतला हें यावरून उघड होतें. ले. ६८ वर फार्सी मोहोर आणि सुमारें दोन अडीच ओळ फार्सी मजकुर व सन आहे. फार्सी मजकुर आणखीहि वरती असावा परंतु तो तुटून गळून गेला असावा.

कृष्णाजी मंबाजी हा रामेश्वरभट वाघोलीकर, मोरया गोसावी वगैरेंच्या पेक्षां धाकटा असला तरी तो त्यांना समकालीन असा एक विरक्त भगवद्भक्त होऊन गेला हें स्पष्ट आहे. रामेश्वर भटांप्रमाणेंच या कृष्णाजी मंबाजीचें स्वतःच्या लेकाशीं विशेष सख्य नसावें असें ले. ६८ वरून प्रत्ययास येतें.

श्री. पांडुरंग कोन्हेर बडवे यांच्या संग्रहांतून मिळलेला ले. ६७ तर १५६३ शकेंतील एक मिरासी वाड्याचे जगाजोती - जगज्योती - यांनीं फरोख्तखत करून दिल्याबद्दल आहे. थिटे हे पंढरपूरचे कुळकर्णी. यांचें बिकलम कागदावर आहे. असे पंढरपुरांतील सांप्रतच्या वास्तूंच्या मालकांनी आपले पुराणे कागद जर बाहेर काढले तर तीन साडेतीनशें वर्षांपूर्वीची पंढरपूरची मांडणी आपणांस त्यांचे आधारें निश्चित करितां येईल.

हरिदास मंडळींप्रमाणेंच बडवे प्रभृति मंडळींचे मूळ कागद पुढें यावयास पाहिजेत. थोडे मिळालेहि आहेत परंतु ते तितके महत्त्वाचे नाहींत, आणि इतके जुनेहि नाहींत. दोन कागद मात्र फार महत्त्वाचे श्री. बहिरट यांनीं हातीं दिले होते त्यांच्या नकला तेथेंच करून दिल्या. पण कागद मूळ पुनः हातीं येतील तर त्यांच्या प्रतिमाच देतां येतील. हे कागद अस्सल विश्वसनीय आहेत. **त्यांत पंढरपूरची श्रीपांडुरंगाची मूर्ति संकटप्रसंगीं चंद्रभागेपलीकडे देगांव आहे तेथें** नेऊन सुरक्षित ठेवीत. चंद्रभागेपलीकडे अंमल मराठे छत्रपतींचा आणि अलिकडे यावनी सत्ता यामुळें घबराटीचा प्रसंग येतांच देवाला बडवे मंडळी नदीपलीकडे नेऊन सुरक्षित ठेवीत. पण तेथील मराठे

सरदारांनीं कांहीं त्रास दिल्यामुळें छत्रपतींकडून त्यांस ताकीद मिळावी अशा आशयाचीं हीं पत्रें आहेत. देगांव अद्यापि पांडुरंगाकडे चालतो. पण तेथें कोण्या स्थळीं देवास ठेवीत तें कळून आलें नाहीं. देव देवळांतून काढून सुरक्षिततेसाठीं त्याचें स्थलांतर होत असल्याचा फार महत्त्वाचा पुरावा ह्या कागदांत मिळतो. पुनः पंढरींत देवास आणतेवेळीं हीं गांवकरी आणि पुजारी यांत कशी बाटाघाट झाली तेंहि एका कागदांत वाचावयास मिळालें. पंढरपुरांतच नव्हे तर आसपासहि पुष्कळ महत्त्वाची ऐतिहासिक सामग्री उपलब्ध होईल अशी माझी खात्री अनुभवानें दृढच झाली आहे. पंढरपूरकर मंडळींनी मनावर घेतलें तर अनेक खंड भरतील एवढें साहित्य प्रकाशांत येऊन आपल्या ज्ञानांत भर पडेल. या कामी थोडा उठाव योग्य दिशेनें होईल तर या गोष्टी सहजांत होऊन जातील. म्हणून या निमित्तानें पंढरीभक्तांची ही जाहीर आळवणी येथें केली आहे.*

आतां पंढरपूरचें वाळवंट सोडून महाबळेश्वराच्या ब्रह्मारण्याकडे पुनः थोडें वळूं. ले. १ व २ यांवर शक १४९५ आहे, प्रारंभी थोडा फार्सी मजकूरहि आहे. त्याचें वाचन 'बमूजिबे नविष्तए हिन्दुई तसही जमालखाँ हवालदार परगने कुडाल' या प्रमाणें आहे. या फार्सी मजकुराचे डाव्या बाजूस कोपऱ्यांत वरील दोन्ही लेखांकांवर

ताा

अशी खूण आहे. त्यावरून या दोन्ही गोष्टी अस्सल बमूजिब म्हटलेल्या तालका असाव्यात असेंच वाटतें. दोन्ही लेखांकांची सर्व ठेवण, अक्षरवटिका वगैरे अगदीं तंतोतंत एकसारख्या आहेत आणि अक्षरवटिका तर शके १४९५ च्या काळाशीं जुळणारी नसून पांच पन्नास वर्षां-नंतरची दिसते. तरीहि कागदांतील मजकुराच्या खरेपणाविषयीं शंका येण्यासारखें कांहीं दुसरें सबळ कारण आढळलें नाहीं. अस्सलावरून करून दिलेल्या या हिन्दुई मजकुराच्या नकला जमालखान हवालदारानें पुढें अधिकृत करून दिल्या असाव्यात असा तर्कच जास्त संभाव्य व ग्राह्य वाटतो. अंताजी मलनाथ प्रभुणे आणि नरसो मलनाथ अंबरखाने यांचा कांहीं धागा जुळेल काय?

दिवाकर गोसावी मठांतील एकूण १–२९ लेखांक येथें घेतले आहेत. या धर्तीचे कागदपत्र ओळखीचे झालेले असल्यामुळें त्यांचा विशेष प्रपंच निवेदनांत करणें नलगे. ले. २१ (शके १६३३) दिवाकर गोसावी मृत्य पावल्याचें नमूद करीत आहे. ले. २८ त अवकाळे तर्फ बारामुऱ्हें गांवचे पाटील व त्याचे बापभाऊ हशमामध्यें चाकर जाहाले

---

* भा. इ. सं. मं चे श्री. ग. ह खरे यांनी आपल्या 'श्रीविठ्ठल आणि पंढरपुर' या पुस्तकाची दुसरी सुधारून वाढविलेली आवृत्ति नुकतीच प्रकाशित केली आहे. त्या कामीं त्यांनी पंढरपुर संशोधनमंडळाचे संग्रहीं जमा झालेले कागदपत्र वगैरे पाहून नोंदी करून घेतल्या त्यांचे निर्देश 'अर्वाचीन उल्लेख' या दुसऱ्या प्रकरणांत केलेलें आढळतील, ते जिज्ञासूंनी पहावे.

आणि भराभर सनदा घेऊन घेऊं लागले त्यामुळें योगक्षेम चालत नाहीं म्हणून दिवाकर गोसावी यांनीं कंटाळून मुबादला मागितल्याची रडकथा वाचावयास मिळते. ले. २० त गुरु गोसावी यांनीं खासा यावें दुसरा खासा पाठवूं नये अशी स्पष्ट मागणी आहे. ले. ८ मध्यें रुद्राजी गोसावी यांनीं रामदासी निःस्पृहपणा धारण केल्याचें कथन आलें आहे.

दिवाकर गोसावी यांचेविषयीं आपणांस अद्यापि पुष्कळ माहितीची आवश्यकता वाटते. ते 'राजकारणी' होते. दिवाकर-संग्रहांत कांहीं ऐतिहासिक घटनांचीं मितीवार टिपणें आढळून आलीं. परंतु त्यांत नवीन विशेष कांहीं न आढळल्यानें त्यांचा संग्रह येथें केला नाहीं.

येलसरच्या गरुड घराण्याचे कागद येथेंच प्रथम प्रसिद्ध होत आहेत. ले. ३० ते ले. ४८ मिळून गरुड घराण्यांत मिळालेले १९ लेखांक येथें निवडून दिले आहेत. ते वाचून पाहतां शके १५७५ पासून शके १६४० पर्यंत ६०।६५ वर्षें गरुड आणि जगताप या दोन घराण्यांत वतन प्रकरणीं कसें मातबर भांडण चाललें होतें त्याचा चित्रपट स्वच्छ मनासमोर उभा राहतो. मसूर जगदळे वगैरे घराण्यांत जसे मारे झाले तसे किंवा त्याहून हि भयंकर मारे येथें वाचण्यास मिळतात. भलेभले संताजी घोरपड्यांसारखे आले, पंचाइती झाल्या तरी वाद चालतच राहिला! या वतनप्रकरणाचा व्रण मराठी समाजाच्या शरीरांत सारखा चिघळत सलत वहात राहिलेला आढळतो. त्याची समग्र छाननी एकदा निस्पृहपणें करण्यासारखी आहे. त्यावेळीं हें गरुड जगताप प्रकरण आपल्या कामीं येईल. **जानो विश्वनाथ** पुण्याचा सुभेदार सरसुभेदार म्हणून या कागदपत्रांत आढळतो. हा पुरुष या कालीं वावरत असल्याचे अन्य कागदपत्रांतहि आढळून आलें आहे. याचाहि छडा करून लावण्यांत आला पाहिजे. दिवाकर, गरुड यांजकडील कागदपत्रांशिवाय प्रस्तुत छोट्या ग्रंथांत **संकीर्ण** या सदराखालीं ले. ४९ पासून ६५ पर्यंत लेखांकांचा संग्रह केलेला आहे. हरिदास-पंढरपूर यांजकडील पांच लेखांक ले. ६६ ते ७० आहेत, त्यांचा परामर्ष मागें घेतलाच आहे. मग संकीर्ण या सदरांतील सतरा लेखांक राहतात.

या सतरांतील ले. ५७। ले. ५८। व ले. ६० हे तीन अस्सल कागद पुण्यांतील कै. नरसोपंत जोगळेकर यांच्याकडून मिळाले. नाना फडणिसांच्या कृपेंतील आप्पाजी गांधलेकर यांच्या कडील कित्येक कागदांत थेट नाना फडणीसांचें वाटेल इतकें बुचकळ्यांत पाडणारें साम्य असलेलें अक्षर आढळतें. त्याच अक्षरांत लिहिलेलीं हीं पत्रें आहेत. ले. ५७ व ६० वर प्रत्यक्ष नानाफडणीसांच्या हातचे शेरेहि आहेत. त्यामुळें दोन्ही वळणांतील साम्याबरोबर भेदांचेंहि ज्ञान होतें.

नाना फडणिसादि मंडळी नवस करीत, मांत्रिकहि बाळगीत हें सर्वश्रुत आहे. तरीहि नानांचे शेरे असलेल्या या याद्या फार उद्‌बोधक वाटतील. ले. ६० मध्यें तर देवाशीं उघडउघड व्यापारी धोरण ठेवलेलें दिसतें! अमक्या तिथीपासून अमुक होईल

किंवा झालें तर देवाला अमुक करूं अशा स्वरूपाच्या नोंदी येथें पाहावयास सांपडतात. हें नवसांचें टिपण नवस केल्यानंतर चार पांच वर्षांनीं केलेलें आहे. आधीं नवस केव्हां तरी केला, त्यांत कांहीं मुदती घातल्या, मग वाटलें कीं एकदा झडती घ्यावी; पहावें कीं, केलेल्या नवसांपैकीं किती फळाला आले, किती वाया गेले. ही झडती इसने तिसैनांत कार्तिक वद्य तृतीयेला घेतली असावी. कारण '**उद्यां**'पासून रोग बरा होऊं लागला आणि एका वर्षांत पक्का गुण पडला तर पुढल्या कार्तिकाच्या वद्य तृतीयेला— हा दिवस वाईच्या डोंगरावरील सोनजाईच्या यात्रेचा असावा—सोनजाईच्या दर्शनास जाऊं. इसने तिसैनांतील कार्तिक वद्य तृतीयेला शक १७१३ चा रविवार येतो ( मोडक जंत्री ) इंग्रजी तारीख नोव्हेंबर १३ इ. स. १७९१ येते.

नानांची प्रकृती रोगपीडित असल्यानें विविध खासगी नवसांचा अवलंब त्यांनी केला आहे. हा खासगत नवसांचा भाग सोडला तरी राजकीय प्रकरणींहि नवस केलेले या यादींत नमूद आहेत. यादीचा प्रारंभ सुाासीतसमानीनांतला आहे. प्रथमच टिपूचे पारिपत्याचा विषय आहे. त्यांत अक्षयतृतीयेची मुदत बालावलीच्या नारायणाला सांगितली आहे. अखेर टिपूवर मोहीम झाली तींत नाना जातीने हजर होते. बादामीच्या किल्यास मोर्चे "वैशाख शुा ३ रविवारी" बसविले. बादामीची स्वारी शके १७०८ मधली. त्या वर्षी वैशाख शुा ३ ला मोडकानी सोमवार दिला आहे. येथें टिपणांत रविवार आहे. यादिवशीं इंग्रजी तारीख १ मे १७८६ आहे. बादामी घेतली वीस दिवसांत, तथापि नवस करून देवांशीं बोली घालण्याचा उद्योग चालूच होता. नाना फाल्गुनापासूनच परत जाण्याच्या गोष्टी बोलत होते म्हणून चैत्र शुद्ध पंचमी पोवतों पुण्यास पोचण्यासाठीं नवसांचें साहाय्य कसें मागितलें व मिळालें तें या यादींत नमूद आहे. अर्थात् या यादींतील नोंदींचा प्रारंभ शके १७०८, इ. स. १७८६ चा आहे. शेवटच्या झडतीचा दिवस आपण वर पाहिलें त्याप्रमाणें शके १७१२ तील आहे. चारपांच वर्षे नवससायास बरेच झाल्यावरही एकच झडती केली हें स्पष्ट होतें.

ले. ५८ राजकारणी महत्त्वाचा आहे. **तो हि वरील जोगळेकर संग्रहांतीलच** आहे. अर्थात् तो नाना फडणिसांकडून मराठी दरबारचे निजाम दरबारांतील वकील गोविंदराव काळे यांस 'घरोब्या'च्या नात्यानें लिहिलेला आहे. टिपू, मराठे, इंग्रज आणि निजाम यांचे चौतर्फी राजकारण अत्यंत गुंतागुंतीचें आहे. तोडीवर तोड करण्यासाठीं मुत्सद्दी धडपडत आहेत. नानांची धडपड ह्या पत्रांत स्वच्छ नजरेस येत आहे. निजामाला किनवीनें इंग्रजांच्या जाळ्यांत ओढला. नानाला वाटलें कीं आपले मुरब्बी गोविंदराव प्रसंगीं असतांना हा कानामागून आलेला किनवी तिखट झाला ! निजामाचा तालामाला पाहून बदामीचा दंश मनांत तो जर राखीत असेल तर पुणे दरबारचें पत्र तसेंच पुढें निजामाला सादर करण्याऐवजीं पुण्यास परत लिहून दुसरें गोड पत्र मागवावयाचें होतें. अशानें होणारा विलंब पुरवला पण आतां राजकारण नासलें !

या पत्राची तारीख पक्की करणें अवघड काम आहे. पत्रांतले सारे धागेदोरे जागच्या-जागीं बसवूनच ती कायम करितां येईल. आमच्या मतें याप्रकरणीं मुंबई राज्यातर्फे प्रकाशित झालेल्या पूना रेसिडेन्सी रेकॉर्डस्-मालेंतील खंड चौथा ( मराठा निजाम रिलेशन्स-डॉ. दिघे ) हा यांतील लेख. ५८ चा नक्की तिथिनिश्चय करण्यास आपल्याला साहाय्यभूत होईल. गोविंदराव काळे यांचे अखबार तारिखवार मिळते तर मग कसलीच कटकट पडतीना ! राजवाडे खंड ७ मधील साहित्यहि उपयोगास येईल. या सर्वांचा विचार करून तूर्त आम्ही या ले. ५८ ची तारीख १४ जानेवारी १७९४ ठरवितो. तूर्त म्हटलें एव्हढ्यासाठींच कीं येथें पुनर्निश्चयाची गरज आहे.

राजकीय दृष्ट्या महत्त्वाचा दुसरा लेखांक ६४ वा, हा सर्व राघोबादादांच्या हातचा आहे. मजकुरांतील संदर्भ पाहतां वाटतें कीं उत्तरेकडून अपयश घेऊन माघारें जातांना मल्हारबाची ढाल लाभावी, असा राघोबाचा हेतु दिसतो. शिं. इ. साधने, फाळके, खंड, ३ ले. ३१८ पृ. २५९ च्या अनुसंधानानें वरील लेखांक ६४ ची तारीख ठरविली आहे. मोडक जंत्रीप्रमाणें त्या दिवशीं बुधवार आहे. त्याचे त्याच दिवशीं बुधवारींच सांडणी पत्र पोंचवील तर पंचवीस रुपये इनाम देण्याचें सुचविलें आहे तेंहि मग जुळतें. राघोबा व गंगोबा यांच्यांत जलद सांडणीच्या एक मुक्कामाचें अंतर असावें. बहुशः ही ले. ६४ ची दिनानिश्चिति परीक्षेला उतरली, तरीहि संशयाची गुंज मनांत राहून जातेच. ले. ६९ मध्यें शकाचा १६४० हा आंकडा १६०० ४० असा लिहिला आहे. ही पद्धति जुन्या ताम्रपटांत व शिलालेखांत आढळते.

ले. ५९ ची तारीख वर छापण्याची राहून गेली आहे. ती चैत्र शु. ९ शके १७२७ म्हणजे ८ एप्रिल इ. स. १८०५ ही येईल.

पुढील चार लेखांकांच्या तारखा ठरविण्यास कांहीं धर हातीं न लागल्यानें ते भुंडेच ठेवले आहेत:- ले. २८, २९, ले. ४३; आणि ले. ६१. पुढेंमागें तोहि साध्य होईल.

'संकीर्ण' विभागांतील लेखांक कोणाकोणाकडून प्राप्त झाले त्याचें दिग्दर्शन त्या त्या स्थळीं केलें आहे. चिंचवड देवांकडील पत्रें दिलीं आहेत, तीं चि. श्री. रत्नाकर आप्पाजी जोशी रायरीकरांचें संग्रहांत मिळालीं. केळशीचे परांजपे हें प्रसिद्ध सावकारी घराणें आहे. जोगहि तेथलेच. केळशी गांव मोठा नामी वसविलेला आहे. तो हरिपंत फडक्यांकडे होता. आजहि तेथें फडक्यांनीं बांधलेलें सुबकसें मंदिर आहे. शिवाजी महाराजहि ज्यांस मानीत ते बाबा याकूब यांचा दर्गा केळशीला लागून असलेलें पूर्वीचे जें उटंबर गांव तेथें डोंगरावर आहे. त्यांचे गुरूचीहि कबर जवळच आहे. दहा वर्षांपूर्वी केळशीस जाण्याचा योग आला असतां या बाबा याकूब दर्ग्यावरील लेख पाहिला. दर्ग्याचें काम अर्धवट राहिलें आहे. बाबा याकूब शिया असावेत असें तेथील पंजा वगैरे कांहीं खुणांवरून वाटलें. कागदपत्र जंजिऱ्यास कोणाकडे—परकार मंडळी किंवा त्यांचे नातेवाईक व उटंबरचे पूर्वीचे इनामदार—गेले असें कळलें. बाबा याकूब यांचा दर्गा संभाजी महाराजांनी

बांधावयास घेतला, पण बाबांच्या मनाईविरुद्ध काम केल्यामुळें काम अपुरेंच पडून राहिलें इत्यादि हकीकत दर्गेवाली मंडळीच्या तोंडून ऐकल्याचें स्मरतें. उटंबरच्या पहाडासमोर एका बाजूस दर्गा पसरलेला आहे.

या उटंबर गांवांतच देवीचें स्थान आहे. तेथील उत्सव अद्यापिहि इतका टीपचंद होतो कीं सांगतां सोय नाहीं. त्याचें समग्र वर्णन कोणी केळशीकर प्रसिद्ध करील तर फार उपयुक्त काम होईल. असा लेख एका केळशीकरानें लिहून ठेवलेला मला वाचावयास दिला होता. पण नक्कल करून देण्यास किंवा स्वतःच छापावयास देण्याबद्दल केलेल्या विनवणीला यश आलें नाही. छपाईखर्च कबूल करूनहि विनवणी वायांच गेली !

याच उटंबर दर्ग्यालगत एक दक्षिणमठ म्हणून जागा आहे. त्यांत एक जुनी शिला आहे. अगदीं झिजलेली, भिजून पापुद्रें सुटणारी अशी पाहण्यांत आली. तिच्यावर कांहीं लेख असल्याच्या खुणा आहेत. नागरी अक्षरें असावीं असें स्पष्ट दिसतें. शिवाय कांहीं मुसुलमानी संस्कारहि असल्याचीं चिन्हें आहेत. या दक्षिणमठाची व बाबा याकूब यांची अधिक माहिती एवढें पुढारलेलें केळशीगांव असून कोणी शोधून काढून प्रसिद्ध करीत नाहीं. एवढें हें दुर्लक्ष पाहून दुःख वाटतें. सुमारें पाऊणशे वर्षांपूर्वी केळशीच्या देवीच्या उत्सवाला अवघ्या कोंकणपट्टींतून पंचवीस हजार यात्रा जमत असल्याचें ग्याझिटि-अरमध्यें नमूद आहे. उत्तर पेशवाईतील नारोपंत फाटक यांनीं येथें मोठालीं तळीं व विहिरी बांधलेल्या आहेत. एकावर शिलालेखहि आहे. अजूनहि रावता महार केळशीकरांतर्फे दापोलीपावेतों संस्कृत आमंत्रणपत्रें पावती करितो. आसपासचे गांवकरी मानकरी येतात ते त्यांचा मानपान, ठरीव पद्धतीनें होऊन आखीव जागेंत, संत्रजी, चटई, या ठरलेल्या मानाप्रमाणें, ठरलेल्या जागीं पाय धुण्याचें पाणी पायावर घेऊन, ठरलेल्या वाटेनें आणि पद्धतीनें, ठरलेल्या सूचनेप्रमाणें येऊन बसतात ! केळशीकर पंचांच्या विचारण्या-वरून अडचणींचा पाढा वाचतात ! ब्राह्मण गोंधळी ( वर्तक–महाजन–मानकरी ) एक पोंवाडा—ऐकून वाटलें कीं यांतील कित्येक तुकडे सहज दोनतीनशें वर्षांपूर्वीचे जुने आहेत—म्हणतात ! ठराविक म्हणजे ठराविक आणि बेत म्हणजे बेत ! पंच पगडी घालूनच बसतील, समईचें चवडेंच असेल, ठराविक वातींचा जुडगा चवड्याच्या प्रत्येक नाकांत असेल, त्यांत पंच सभा असेल तोंवर मानकरी पंच तेल घालण्यासाठीं उभा असेल, विडे सुपारी द्यावयाची तेव्हां मुठींत मावेल तेवढी भरून सुपारी दिली पाहिजे, प्रतिपदेला पंचांग सांगण्यासाठीं देवळाचे दरवाज्यासमोर लहानसा लाकडी बैठकखाना गांवचा सुतार न सांगतां उभा करतो. पण तो सरळ नव्हे, कांहीं कोन करून. देवीचे मिरवणुकीचा रथ कीं कायसें करतात तें गांवाजवळ एक जागा आहे तेथें सरळ नव्हे पण असाच कोन करूनच ठेवतात. गावचा ढोल्या गुरव उत्सवाचें आमंत्रण मानाप्रमाणें ढोलावर मेजून काठ्या वाजवून दारावरून जाऊन देतो आणि एका खुणेच्या मर्यादेपाशींच थांबतो, ढोल ठरल्या खुंटीलाच टांगून ठेवला पाहिजे, उत्सवाला प्रारंभ करण्याच्या रात्रीं ढोल्या गुरवाचा ढोल उंचावर बसून वाजला कीं उत्सव संपेपर्यंत गावांत वाद्यें बंद, असे एक ना

दोन प्रकार काय सांगावे, सर्व रेखीव, आखीव. परस्परांत कडाक्याचे हेवेदावे आणि भावकी-गावकीचीं भांडणें असणारे गांवकरी आणि मानकरी पंच एकत्र येऊन सर्व बिनबोभाट करीत असतात !! अपूर्व वाटलें !! आणि एवढ्याच साठीं दहा वर्षे गेलीं, आम्हींहि पुनः जाऊं तेव्हां जाऊं, पण थोडे निमित्त सांपडल्यानें येथें हें वृत्त त्रोटकपणें नमूद केलें आहे.

कालानुक्रमानें सर्व लेखांक छापावें हें योग्य. या संग्रहांतील नुसतें 'संकीर्ण' सदर पाहिलें तर त्यांत संकीर्णपणाची बाधा कालानुक्रमालाहि झालेली दिसेल. तांतडीचा तडाखा असाच असणार ! एवढा परामर्ष पुरे म्हणून उल्लेख केलेल्या आणि न केलेल्या सर्व साहाय्यकांचे आणि काम करवून घेणाऱ्या सहकाऱ्यांचे आभार मानून थांबतों !

चंद्रग्रहण आषाढ शु. १५ श. १८७५ पुणें

दत्तो वामन पोतदार



ठसा– पुणें जिल्हा सहकारी खरेदी–विक्री संघाचे कृपेनें

# ऐतिहासिक संकीर्ण साहित्य

## खंड ८ वा

## महाबळेश्वर–दिवाकर गोसावी

ले. १

{ श. १४९५ माघ शुा ५ बुध
{ इ. १५७४ जाने. २७

[ वर फाटलें आहे ]

रा तुळजाजी रूपाजी नाईक देसाई प्रा मो मजकूर — तिमाजी सोनजी नाईक देसाई प्रा मजकूर

( गोल शिक्का शिक्यांत वर श्री खालीं तीन अस्पष्ट ओळी व खालीं नांगर ) — सही ( मोडी अक्षरें )

सके १४९५ *भवानाम संवत्सर माघ सुध पंचमी ते दिवसी राजश्री **अंतो मलनाथ प्रभुणे** वस्ती का कुडाल्ल यासि **नामजोशी** प्रा मा कारण कागद लिहून दिल्हा यैसा जे राजश्री **तिमाजी नाईक देसाई** प्रा मजकूर यामधे व **देऊजी पंताजी** व **कमलाजी रामाजी** देसकुल्लकरणी व गावकुल्लकरणी प्रा मा यामधे कारभारमुत्ले अदावत पडली त्यास पर(ग ?) णे मजकूरचे देसकल्लकर्ण व गा कुल्लकर्ण देसमुखाने तुम्हास दिधले त्यास तुम्ही गैरमवसर खर्चास नाही म्हणौन आम्हापासून होण १०० संभर घेतले आणि तुम्ही आम्हास गाव गाहाण अठ दिल्हे बाा ता——

| | |
|---|---|
| १ रायेगाव | १ अनेवाडी |
| १ सायेगाव | १ खरसी |
| १ अरडें | १ हरे बुजरुख |
| १ मरड मुर्‍हे | १ सोनगाव |
| ४ | ४ |

येकूण अठ गा कुल्लकर्ण दिल्हे त्यास आपले पैके होण शंभर दो वरसानी द्यावें जर्‍ही पैके नेखाडो तरी तुम्हास जे साधेल त्याची निमे तक्षीम आम्हास द्यावी वेव्हारास

* संवत्सर नाम पुढल्या वर्षाचें आहे.

अनखी शंभर होण पडले तऱ्ही आपण देऊ आणि तुम्ही आपले शंभर होण दो वरसानी दिल्हे तऱ्ही आपणास तुमच्या गावासी समध नाही व्याजाबदल कुलकरण्याचा हक खाऊन पैके पावलियावरि तुमचे गाव तुमचे हवाला करू आम्हास गावासि निसबती नाही हा कागद लिहोन दिल्हा सही बाा ओं ( लपेट दार )

* तेरीख १७ रबिलाखर———सवाल ४

---

ले. २ } श्री अस्सल मोडी { श. १४९५ माघ शु. ५ इ. १५७४ जाने. २७

श्रीमेरुलिंग ( दोन फार्सी ओळी )

रा। तुळजाजी रुपाजी नाईक देसाई प्राा मजकूर

तिमाजी सोनजी नाइक देसाई प्राा मजकूर

श्री कमळोजी ......... कदम.....

( गोल शिक्का शिक्याच्या तळास नांगर )

सही ( मोडी )

सके १४९५ भवा नाम सवतछरे माघ सुध ५ पंचमी ते दिवसी राजेश्री **नामजोसी** पाा कुडाळ यासी **अतो मलनाथ प्रभुणे** काा मजकूर कारणे कागद लेहून ( दिधला ) येसा जें **तिमाजी नाईक..........** व **कमलाजी रामाजी देसकुलकर्णी** व गावकुलकर्णी प्राा मजकूर यामधे कारभार मुले अदावत पडली त्यास प्राा मजकूरचे देशकुलकर्णी व गांवकुलकर्णीपण अम्हास दिधले **देवजी पंताजी** व **कमळाजी रामाजी** देशकुलकर्णी व गावकुलकर्णी यामधे व आम्हामधे वाद पडला त्यास आपन गैरमवसरदार याबदल तुम्हापासून होन १०० सेभर घेतले अनी तुम्हास गाव गाहण दिधले बाा ताा———————————————

देह आठ

...............................फाटले

येकुण गाव ८ अठ दिधले तुमचे पैके होण शेभर दो सालानी देऊन जोवरि दोन साले पैके फिटत तोवरि व्याजाबदल अठ+ गांवीचे कुलकर्ण दिधले असे यासि वेवादमुले

---

* येथें पैवस्ती असें म्हटलें नाहीं पण तें असावें. पैवस्ती ( म्हणजे कागद पोचल्याची तारीख = ) श. १४९६ श्रावण वद्य ४ ( इ. १५७४ ऑगस्ट ६ ) शुक्रवार ही मिती तारीख १७ रबिलाखरची येईल.

\+ येथील मूळ शब्द खोडून अठ हा शब्द गिरवला आहे.

अनींखि सेभर होण लागले तर घेऊन आनी तुमचे दोनसे होन देऊन आणि आमचे गाव आम्ही घेऊन जरी पैके न फिटत तरी जे व्रीति साधेल त्यामध्ये तुम्हास निमे देऊन अम्ही निमे खाऊ यासि अनेथा होईल तरी व

...............................................................................

हे कागद.........

बीा वो

तेरीख १७ रबिलाखर

---

ले. ३ } ×× { श. १५९४ आषाढ शु. ९ इ. १६७२ जून २३

पंडीतराव वर्षासन पत्र ( मालकाच्या हातचें )

( लंबवर्तुळ शिक्का ) ० श्री ‿ चिंतामणिच रण शरण

श्री सकलगुणगणमडित सौजन्यसिधु राजमान्य राजश्री **विठल दत्तो** सुभेदार व कारकून हाल व इस्तकबाल सुभा **जाऊली** गोसावी यांसी प्रति ×× पंडित **रघुनाथ** कृतानेक नमस्कार सुहुर सन सलास सबैन अलफ वेदमूर्ती **अनतभट विन** ( मोरेस्वर ) **भट महाभलेश्वेरकर** सो **माभलेश्वर** ता मा यो ×× सि धर्मार्थ तादुल कोठी मापे मण ·।· पांच रास देविले आहेत ××× यांसी तादुल कोठी मापे ·।· पाच मण रास आदा करणें हरसाल ताजे सनदेचा उजूर न कर्णे तालिक लेहुन घेऊनु असल परतुन दिजे प्रतिवर्षी चालविजे जवरि वेदमूर्ती सुखरूप आहेती तोवरी चालवीजे छ ७ माहे रबिलोवल हे विज्ञाप्ति सुभं ( षटकोनी मुद्रा )

( मार्गे ) बार सुद भवतु

---

ले. ४ } श्री { शक १५९५ अधिक भाद्र. व. १४ इ. १६७३ आगष्ट ३०

पंडितराव वर्षासन पत्र ( याप्रमाणें बालबोध शेरा मालकानें केला आहे )

( लंबवर्तुळी तीनपदरी शिक्का ) श्री चिंतामणिच रणशरण

सकलगुणगणमडित: सौजन्येसिधु राजमान्ये राजश्री **विठल दतो** सुब्येदार व कारकून हाल व इस्तकबाल सुभा ता **जाऊली** प्रति पोष्ये **मोरेश्वर पंडितराव** नमस्कार शुहुर सन अर्बा सबैन व अलफ बदल धर्मादाऊ वेदमूर्ति **रामचंद्रभट** विन **सोनभट** सेकीन **महाबलेस्वर** यासि तादुल मोठे कैली कोठी मापे सालिना मण ·।।· दाहा मण रास देविले असेति हर-

साला सदरहू प्रमाणें सुबे मजकुर पैकी सालदरसाल आदा करीत जाणे व वणि गाई ४ च्यारची माफ केली असे च्यार गाई पोटफाडिया यक पावेतो यांच्या ज्या असतील त्याची वणी घे + + णे हरसाला ताजा सनदेचा उजूर न करता इस्तकबिल साल मजकुरापासुनु साल दरसाल हेच सनदेवरून जोवरी भट गोसावी क्षेम तोवरी चालवणे तालिक लिहुन घेऊनु असल परतोन देणे छ २७ जमादिलोवल सुभं (षटकोनी मुद्रा) भवतु

---

ले. ५ } श्री {श. १६०१ आश्विन वद्य ११ / इ. १६७९ आक्टो. २०

पंडीतराव वर्षासन पत्र (बालबोधींत मालकाच्या हातचें)

श्री सकलगुणगणमडित अखडित लक्षुमी अलरुत राजमान्ये राजश्री ——— व देशलेखक प्राा **जाऊली** भावी वर्तमान गोसावी यासि पोष्ये **मोरेश्वर पडितराये** कृतानेक नमस्कार सुा समानीन अलफ शके ६ सिधार्थी नाम

(लंब वर्तुळ दुपदरी) ० श्री ᴗ चिंतामणि चरण शरण

संवछरे अस्वनि वादि येकादसी सोमवार वेदमूर्ती **सोनभट** बिन **रामभट** वास्तव्य क्षेत्र श्री—माहाबलेस्वर ब्राह्मण तपस्वी बहुत योग्य देखोन धर्मादाये तादुल मोटे केली कोठी मापे मण ·।।· दाहा व करभार प्रसुता गाई ४ येणेप्रमाणे देविले आहे तरि जोवरि वेदमूर्ती क्षेम असतील तौवरि प्रतिवरुशी परामुश घेऊनु तादुल मोटे केली कोठी मापे मण दाहा देणे व करभार प्रसुता गाई भट गोसावियाच्या खासगत असतील तरी बरे चौकस मनासी आणुन च्यारी पावेतो पालित जाणे प्रति वरुशि नुतन पत्राचा अक्षेप न करणे प्रति लिहुन घेऊनु मुख्य पत्र वेदमूर्ती जवली देणे रा* छ २४ *माहे रमजान +हे विज्ञप्ति (सुभ भवतु) (षट्कोनी एक पदरी मुद्रा)

*बार सुद *बार

---

ले. ६ } श्री {श. १६१८ आश्विन वद्य २ / इ. १६९६ आक्टो. २

वरषासन पत्र (सर्व अक्षरें बालबोध)

श्रीसकल गुणगण मंडित अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री **माहादाजी सामराज** सभासद व लेखक वर्तमान व भावी प्रा **जाउली** गोसावी या प्रति **श्रीकरा-**

---

*अक्षरें निराळीं + बालबोधींत

**चार्य पंडितराऊ** आसीर्वाद राज्याभिषेक शके २७ धातानाम (सव) छरे अस्वीन बहुल द्वितीया भृगुवासर वेदमूर्ति **गोपाळ(भट)बिन दिवाकरभट** वास्तव्य श्री—यानी हुजूर विदित केले आपलियास धर्मादाय पूर्वी पासून नाही त्यावरून मनास आणिता (ब्रा)ह्मण भले कुटुंब वत्सल देखोन नूतन धर्मादाउ साल मजकुरापासून कैली कोठी मापे तांदूल ·॥· चेकूण दाहा मण रास देवविले आहे प्रांत मजकूर पैकी प्रविष्ट करणें सदरहू दाहा मण पैकी चतुर्थांश इतलाख (देणे) बाकी ·१२॥ साडेसात मणाची पड जमीन रा। **आनाजीपंता** (चे धारीयाने) नेमून देणें त्याची कीर्दी करून भट गोसांवी उपभोग करीतील (प्रति) वरषी नूतन पत्राचा आक्षेप न करणे प्रती लेहोन घेउनु मुख्य पत्र गोसांवियापासी भोगवटेयास परतुन देणे छ १५ रबिलोवल सुहुर सबा तिसैन अलफ *पा हुजूर हे +आशिर्वाद

(श्री लक्ष्मी कांत प। दांभोज भजनात। समुन्नतेः॥ धर्म प्रव। र्धिनी मुद्रा श्रीकर स्य विराजते॥ (लंबगोल दोन पदरी लहान अक्षरी सहा ओळींचा शिक्का))

(मोर्ग) बार

शुभंभ वतु। (दुपदरी लंब वर्तुळ मुद्रा)

* अक्षर निराळें. + बाळबोध अक्षरें.

---

ले. ७ श्री {श. १६१८ / इ. १६९६}

अखंडित लक्षुमी अलंकृत राजमान्य राजश्री **माहादाजी सामराज नामजाद** व कारकून सुभा **जावली** गों (से)वक **रामचंद्र निलकंठ** नमस्कार सुाा सबा तिसैन अलफ मौजे **खरसी** ताा बारामुन्हे हा गांव महाबलेस्वरच्या ब्राह्मणांस अगृहार इनाम करून दिल्हे आहे त्यास गांवकरानीं उपद्रवाकरिता डोंगरी घरे केली (आहे)त गावाची पांढर आहे तेथे सेते केली आहेत + + + तुम्ही पाहाणी केली म्हणून विदित ............................(मोर्तब आहे)

सुरुसुद

---

ले. ८ (वरचा भाग फाटला) {श. १६२० भाद्र. शु. ७ शुक्रवार / इ. १६९८ आगष्ट २६}

श्री सकल गणमडित अखडित लक्षुमी अलंकृत राजमान्य राजश्री **विठल गोपाल सभासद** नामजाद व लेख(क) वर्तमान व भावी प्रांत **जाऊली** गोसाविया-

प्रति **श्रीकराचार्यें पडितराऊ** अश्रीर्वाद राज्याभिषेक शके २५ बहुधान्य नाम संवछरे भाद्रपद शुध प्रतिपदा भृगवासरे वेदमुहूर्ती **गोपालभट विन दिवाकरभट महाबलेस्वरकर** वास्तव्य क्षेत्र श्री——— यानी आपणासमीप येऊन विदित केले की मौजे **खरसी** साा बाऱ्हामुरे सुभा प्रांत मजकूर हा गाव ब्राह्मण समस्त क्षेत्रस्त यासि अग्राहार दिल्हे आहे त्यास आपणास तेथे काही विभाग भूमि दिली पाहिजे त्यावरून मनास आणिता भट गोसावी भले योग्य कुटुंब वेछेत्ल जाणोन मौजे मजकूरपैकी पेसजी **रुद्राजी गोसावी** यासि बिघे अट होते चैसियासि गोसावी मजकूर निस्प्रहता धरून तीर्थाटणासि गेले त्यास्तव तो ऐवज वेदमूर्तीस सदर्हू बिघे ८८ अट नेमून दिल्हे आहेती ते पुत्रपौत्री वौश परंपरेस सुरक्षित चालू देणे प्रतिवरशी नुतन पत्राचा अक्षेप न करणे या पत्राची तालिक लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटियासी वेदमुहूर्तीपासी परतुन देणे छ २९ सफर सुहुर सन तिसा तिसैन अलफ *पाा हुजूर हे+ आसीर्वाद ++ (वाटोळी दुपदरी दोन ओळींची शुभं भ मुद्रा) वतु

श्री
लक्ष्मीकांत प
दांभोज भजनाप्त
समुन्नते •• ॥ धर्म प्रव
र्धिनी मुद्रा श्रीकर
स्य विराजते ॥
(लंबगोल दोन पदरी
लहान अक्षरी शिक्का)

(पाठीमागें) बारसुद (अक्षर निराळें)
पोाा छ १५ रबिलाखर (अक्षर निराळें)

---

**ले. ९** } श्री { श. १६२० भाद्र. वद्य १३
इ. १६९८ सप्टं. २२

अखडित लक्षुमी आलक्रुत राजमान्य राजश्री **विठल गोपाल** सभासद नामजाद व कारकून सुभा प्रांत **जावली** गोसावि यांस

सेवक **रामचंद्र नीलकठ** अमात्य नमस्कार सुहूर सन तिसा तिसैन अलफ वेदमुहूर्ती **अनतभट वीन रामभट माभलेस्वरकर** आसरीत राजमडल यांस राजश्री———छत्रपति स्वामींने प्रतिवरसी वरशासन होन पाा १२ बारा होन पावायाचा नियत केला आहे त्यायेवजी प्रांत मजकुरी पड जमीन सदरहु बारा होनाची देविली असे तर राा **आनाजीपंताचे** कारकीर्दीस जमिनीस धरा व गलियास नीर्ख असेल त्याप्रमाणे पड जमीन चतुःसीमा करून नेमून देणे भट गोसावियास अनकूल होईल वतनदार खेरीज करून ठिकाण असेल ते नेमून देणे प्रतिवरसी ताजे सनदेचा

---

*हें अक्षर निराळें. +हीं अक्षरें बालबोध आहेत व तीं श्रीकराचार्यांच्या हातचीं आहेत.

उजूर न करणे तालिक लिहून घेऊनु असल पत्र भट गोसावियाजवळ परतून देणे छ २७ रबिलोवल* निदेस समक्ष लेखन (लंब वर्तुळ तीन ओळींचा

सीमा सम मोर्तब )

लसती

मार्गे * बार *सुरु सुद *बार

पैा छ १४ रबिलाखर ( आश्विन १५ = आक्टो. ९ )

---

ले. १० श्री { श. १६२१ भाद्र. शु. ७ / इ. १६९९ आगष्ट २१ }

मा। अनाम **महादाजी नरसी रामाजी मोरेश्वर** व **केशवभट थिटे वाईकर** यांसि **परशराम त्र्यंबक प्रधान** सुहुर सन मया व अलफ रा। **रुद्राजी पुंडलिक** दिा चिटनिसी सेवक राजमंडल यांची मुलेमाणसे श्री——महाबळेश्वरी आहेत यैसियास तुम्ही नसता कथला यासी करिता उपद्रव देता म्हणुन कळो आले तरी उगाच गैर-हिसाबी कथला यासी करावया तुम्हास काय गरज आहे या उपरी येकंदर ऐसी गोष्ट न करणे उगीच गैरहिसाबी कथला यांसी केलिया तुम्ही जाणा जाणिजे छ ५ रबिलौवल *निदेश समक्ष ( दुपदरी लंब वर्तुळी तीन ओळींची मुद्रा ) ( विलस तिलेख नावधि )

( मार्गे ) सुरु सुद

---

ले. ११ श्री { श. १६२३ / इ. १७०१ }

श्री

आई आ

दि पुरुष श्री राजा

शिव छत्रपती स्वामि ( गोल शिक्का दोन पदरी

कृपानिधि ॥ तस्य प सात ओळींचा )

रघुराम त्र्यंबक

प्रतिनिधि

अभये पत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिध राजमान्य राजश्री **परसराम त्र्यबक प्रतिनिध** ताहा मोकादमानी मौजे **खरसी** सां। बारामुरे सुबा जावली सु॥ इसने मया अलफ दिल्हे अभयेपत्र यैसे जे मौजे मजकूर इनाम वेदमूर्ति ब्राह्मणानी वस्ति **श्रीमहाबलेस्वर** यासी यग्राहार + + + + + + + + + ण + + सीबा हुजरून मौजे मज............

---

* अक्षर निगाळें.

ले. १२ } श्री { श. १६२३ मार्ग. वद्य ७
रघुनाथ { इ. १७०१ डिसें. ११

(मा) अनाम हवालदार व कारकून तपे **मेढे** यासी **पर(शराम)त्र्यंबक प्रतिनिध** सुहुर सन इसने मया अल(फ) श्री——देव मोकाम **चाफल** यासी ईनाम व + + + तपे मजकूर पैकी + + मौजे सायेगाऊ + + खेरीज ईना + + (ह)कदार आहे त्या प्र(माणे चा) लवणे त्या गावापैकी ये(क चा)वर जमीन भालचंद्र भाट व ह + + भट माबलेस्वरकर + + सी इनाम आहे ते इना(म) त्याचे चालवणे वरकड गा + + इनाम चालवणे + + लावणी संचणी वि (सि) तुम्ही व देसक मन घा (लून) गाव महामूर होऊन (श्री)स येवज पावते करणे

जकाती तपे मजकूर मोकासा पुरातन आहे त्याप्रमाणे करार केले आहे खेरीज सा माहाल यैन हसील जो होईल तो कराविसदार खेरीज करून श्रीकडे पावणे

(येणे) प्रमाणे श्रीकडेस चालवणे तुमी माहाली होऊन उपसर्ग न देणे जाणिजे व सदरहुचे देखरेख रा(दिवाकर) गोसावी करतील तुमी त्याचे साहित्य + + (श्री) कडे सुरक्षित येवज पावे येसे करणे छ २१ रजब पा हुजुर राजते लेखना वधी

(गोल दुपदरी तीन ओळींची मुद्रा)

सुरूसुद

---

ले. १३ } श्री { श. १६२४ श्रावण वद्य १
{ इ. १७०२ जुलै २८

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री **विठल गोपाल** सुभेदार व कारकून प्रांत **जावली** गोसावी यासी

सेवक **परशराम त्र्यंबक प्रतिनिधि** नमस्कार सुहूर सन सलास मया व अलफ मौजे **हरचंदी** ता **आठेगाऊ** श्री—स्वामीकडे आहे तेथील वसूल सालमजकुरी रुपये १० दाहा घेतले म्हणून विदित जाले तरी वसूल परभारे जाहाल्यानें श्रीस्वामीकडे येवज काय पावो पाहतो बरे वसूल होऊनु गेला त्याचा मुबदला येवज पावणे त्यास गावापैकी बाकीसाकी असेल ते श्रीकडे पावणे याउपर मौजे मजकुरावरी येकंदर रोखे न करणे वसूल न घेणे जाणिजे छ १३ रबिलोवल पा हुजुर राजते

लेखना (अष्टकोनी मुद्रा
वधी तीन ओळींची)

---

ले. १४ श्री { श. १६२५ भाद्र. वा १४
इ. १७०३ सप्टंबर २८ }

छ. माा देशमुख व देशकुलकर्णी ताा **कुडाल** यासी **परशराम त्र्यबक** प्रतिनिधी सुाा अर्बा मया व अलफ राजश्री **दिवाकर गोसावी** यासी ताा माारी ईनाम भूमी पेसजी नेमून दिली आहे गावगना जमीन चावर

श्री आई आदी पुरुष श्री राजा सीव रुपानीधी परशराम त्र्यंबक प्रतीनीधी ( तीन वळयें सहा ओळींचा कोयरी आकार )

मौजे आखाडे मौजे भिवडी मौजे बामणोली

·।१० ·।१० ·।१०

येकून येक चावर नेमून दिली आहे परंतु गावगना जमीन मेजून (त्यां)चे स्वाधिन केली नाही तरी तुम्ही सदरहु प्राा जमीन गावगना मेजून याचे स्वाधीन करणे ये गोष्टीस हईगई केली आणि फिरोन बोभाट आला म्हणजे मुलाहिजा होणार नाही जाणिजे छ२७ जमादिलावल *पाा हुजुर ( ~ ले ० ( तीन पदरी कोयरी खना वधी तीन ओळींची मुद्रा )

( मागे ) सुरु सुद

पौ छ १७ सफर ( श. १६२६ ज्येष्ठ वाा ४
सुाा खमस मया अलफ = इ. १७०४ जून १० ).

---

ले. १५ श्री { श. १६२५ भाद्र. वद्य १४
इ. १७०३ सप्टं. २८ }

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री **सुरो विठल सुभेदार** व कारकून प्राा व्याघ्रगड गोसावी यासी

सेवक **परशराम त्र्यंबक** प्रतिनिधि नमस्कार सुाा अर्बा मया व अलफ राजश्री **दिवाकर गोसावी** माभळेस्वरकर यासी पूर्वी राजश्री स्वामींनी इनाम कुडाल ताास गावगणा नेमून दिला आहे चावर जमीन चावर १

मौजे आखाडे मौजे भिवडी मौजे बामणोली

·।१० ·।१० ·।१०

येकून येक चावर नेमून दिला आहे परंतु गावगना भूमी नेमून याचे स्वाधीन केली नाही तरी तुम्ही सदरहू प्राा गावगणा भूमी नेमून याचे स्वाधिन करणे या पत्राची

---

* अक्षर निराळें.

तालीक लिहोन घेऊन मुख्य पत्र भोगवटेयास परतोन देणे जाणिजे छ २७ जमदिलो-वर *पा हुजुर ⌣ ले ० खना वधी (तिपदरी तिओळी कोयरी मोर्तब)
(मार्गे) सुरु सुद

---

ले. १६ } श्री { श. १६२५ आश्विन शु. १४ इ. १७०३ आक्टो. १२

० ⌣

श्री शिवचरणी
तत्पर प्रयाग अा
नंत नीरंतर (लंब वर्तुली दुवलची तिओळी मुद्रा)

---

रोखा अज स्वारी राजश्री **प्रयाग अनंत सभासद** जमाव सातारकर ता। मोकदमानी मौजे **भिवड** ता। कुडाल सुा। अर्बा मिया अलफ मौजे मजकुरी इनाम रा। **दिवाकर गोसावी** यास राजश्री पंतप्रतिनिधि स्वामिनी चिघे * १० चालिस दे(विले) आहेत × × × × व देसकुलकर्णी न × × × पड देतील त्याप्रमाण तुम्ही नवी पड देणें उजूर न करणे जाणिजे छ ११ जमादिलाखर मोर्तब (गोल मुद्रा
सुद दोन पदरी दुओळी)

---

ले. १७ } श्री { श. १६२६ ज्येष्ठ वद्य ४ इ. १७०४ जून १०

इनाम मौजे **वामणोली** प्रा। **कुडाल** सुा। खमस मया अलफ वेदमूर्ती रा। **दिवाकर गोसावी** वास्तव्य श्री क्षेत्र **माभलेस्वर** बाा। सनद रा। छेत्रपति व सर-कारकून व सुभा व महाल प्रा। मार उा। देशमुख व देशपांडे व मोकदम मौजे मजकूर जमिन विसा पांडाच्या चिघे ने ·।१०

८॥-

८२० वडाची कानजाई पैकी प ... उत्तर
दक्षण चेकूण
८२० पांढरी पैकी

·।१०

(मार्गे) ता। छ १७ तारण सवछरे (वद्य ४ इ. १७०४
सफर सुा। खमस मया अलफ जेष्ठमास जून १०)

---

*अक्षर निराळें.

ले. १८ } श्री { श. १६३१ वैशाख शु. १५
माभलेस्वर { इ. १७०९ मे १२

मा। अनाम हुदेदार छत्र श्री——यास **गदाधर प्रलहाद प्रतिनिधि** सु॥ तिसा मया अलफ श्री क्षेत्रीं राजश्री **दिवाकर गोसावी** आहेत येसियास पेसजी गुरवानी त्यांच्या बाडियाची बिंती पाडिली म्हणोन विदित जाले तरी गोसांवीयाच्या बाडियाची भिती पाडावया गुरवांस काये गरज आहे याउपरी त्यांस ताकीद करून पेसजीप्रमाणे भिंती घालवणे फिरोन बोभाट आलियां ताकीद होईल *जाणिजे छ १२ रबिलोवल पा हुजूर राजते ( अष्टकोनी दुपदरी तिओळी
लेखना मोर्तब )
वधी
(मागे) सुरु सुद

---

ले. १९ } श्री { श. १६३१ मार्ग. शु. २ मंगळ
{ इ. १७०९ नवं. २२

राजश्री **कृष्णाजी केशव** हवालदार व कारकून वर्तमान व भावी सा॥ **बारामुरे** गोसावी यांस

॥ छ्र अखडित लक्षुमी अलकृत ( राजमान्य राजश्री ) सेवक **विठल गोपाळ** सुभेदार व कारकून सुभा **जाऊली** नमस्कार सु॥ असर मया अलफ वेदमूर्ती **अनटभट बिन रामभट माभलेस्वरकर** अस्रीत राजमडल यास

(अष्टकोनी दुपदरी शिक्का)
श्री गंगेव
+ + + + जनता
+ नंदीनी विठल
स्य महाबुद्धे + +
+ + + राजते

राजश्री छेत्रपति स्वामीनी प्रतिवर्षी होन पा॥ १२ बारा द्यावयाचा नियेत करून अज्ञापत्रे सादर केली आहेत त्या वर्षासनाचे थैवजी सुभाहून वेदमूर्तीस जमीन बिघे ०१६ सोला बिघे मौजे **पानस** ता॥ मा॥र येथे नेमू(न) दिल्ही आहे ते पत्रे मनास अणून हाली राजश्री पंतप्रातिनिधि याचे पत्र छ+ ५ रजब पौ छ १ सव्वाल सादर जाले त्यावरून तुम्हास पत्र सादर केले असे तरी मौजे मा॥र पैकीं सदरहू सोला बिघे चालवीत जाणे नवीन पत्राचा प्रतिवर्षी अक्षेप न करणे. या पत्राची तालिक लिहोन घेणे मुख्य पत्र वेदमूर्ती जवली भोगवटियास देणे छ १ सव्वाल* मोर्तब सुद

मोर्तब ( आष्टकोनी दुरेघी दुओळी मुद्रा )
सुध बार

---

+ श. १६३१ भाद्र. शु. ७ = १७०९ ऑगष्ट ३०.
* येथून पुढील अक्षर निराळें.

**ले. २०**

श्री

श. १६३३ फाल्गुन शु. ७
इ. १७१२ मार्च ३

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे फालगुण शुध सप्तमी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा **शाहु छत्रपति** स्वामी याणी मोकदमानी मौजे **भिवडी** ता। **कुडाल** पा। ऐसाजे मौजे मा।र पैकी **दिवाकर गोसावी** यांस जमीन बिघे ·।१० चालीस पुरातन ईनाम चालत आला आहे तेणें प्रा। त्याचें पुत्र **भैरवभट** यास चालवायाची आज्ञा केली असे तरी बिलाकुसूर चालवणें लेखनालंकार मर्या (पट्कोनी देंयरा दुपदरी कर्तन जते मोर्तब.)

◯ श्री ०
शाहू नर
पति हर्ष नि
धान मोरेश्व
र सुत भैरव
प्रधान
(तीन पदरी
कोयरी शिक्का)

◯ ०
श्रीमत्र्यंबक
भक्तस्य शाहूप्रति
निधे मता नारायण
स्य मुद्रेयं प्रल्हाद
तनुजन्मनः
(लंब वर्तुळ तीन
पदरी शिक्का)

(मार्गे) रुजु[1] बार[1] सुद सुरु[1] सुद बार[1]

---

**ले. २१**

श्री

श. १६३३ फाल्गुन शु. ७
इ. १७१२ मार्च ३

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे फालगुण शु... सप्तमी इंदुवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा **शाहु छत्रपति** स्वामी यांणी देशमुख व देशकुलकर्णी ता। **कुडाल** यासी आज्ञा केली ऐसीजे ता। मा।री गांवगना ईनाम जमीन दिवाकर गोसावी यांस चालत होती ते मृत्य पावले हाली त्यांचे पुत्र **भैरवभट** यास तो इनाम चालवायाची आज्ञा केली आहे बी॥

◯ श्री ०
शाहु नर
पति हर्षनि
धान मोरेश्व
र सुत भैरव
प्रधान
(तनि पदरी
कोयरी शिक्का)

◯ ०
श्रीत्र्यंबक
भक्तस्य शाह प्रति
निधे मेता नारायण
स्य मुद्रेयं प्रलहाद
तनु जन्मनः
(लंब वर्तुळ तीन
पदरी शिक्का)

| भिवडी बिघे | बाम्हणोली बिघे | आखाडे बिघे |
|---|---|---|
| ·।१० | ·।१० | ·।१० |

येकुन येक चावर जमीन देहाय मा।रपैकीं **भैरव (भट)** यास ईनाम चालवणे

१ सर्व निरनिराळें अक्षर.

पुरातन चालत अले असेल त्यास खलेल एक जरा न करणें जाणिजे *लेखनालंकार
मर्या (अष्टकोनी
देयं रा दुपदरी मोर्तब)
जते
(कागदाच्या पाठीमागें) *रुजु *बार सुद *सुरु सुद बार

---

ले. २२ } श्री { शक १६३३ फाल्गुन शु. ७ सोमवार
इ. १७१२ मार्च ३

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे फालगुण शुध सप्तमी इंदुवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा **शाहु छत्रपति** स्वामी यांणी मोकदमानी मौजे **आखाडे** ताा **कुडाल** यासि आज्ञा केली ऐसीजे मौजे माारि **दिवाकर गोसावी** यांस पुरातन ईनाम चिघे ।++ चालिस चालत आला आहे तेणेंप्रमाणें त्याचे पुत्र + वभट यास चालवायाची आज्ञा केली आहे तुम्ही चालवणें लेखनालंकार

(कोयरी शिक्का)
० श्री ◡
शाहुनर
पति हर्षानि
धान मोरेश्व
र सुत भैरव
प्रधान

(लंबवर्तुळ शिक्का)
० ◡
श्रीमत्त्र्यंबक
भक्तस्य शाहु प्रति
निधे र्मता नारयण
स्य मुद्रेय प्रलहाद
तनु जन्मनः ।

मर्या (सहाकोनी मुद्रा)
देयंरा
जते रुजु
बारसुद सुरुसुद बार

---

ले. २३ } श्री { श. १६४८ चैत्र शुा ५ रविवार
इ. १७२६ मार्च २७

रामदासस्वामी (मोडी)

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५२ पराभव सवत्सरे चैत्र शुध पचमी रविवासरे क्षेत्रीये कुलावंतस श्री राजा

---

* अक्षर वेगळें वेगळें.

| ० श्री ८ | + + + + |
|---|---|
| राजा शाहु न | श्री आई आदी पु |
| रपती हर्षनीधा | रुष श्री राजा शाहु छ |
| न बाजीराव बल्ला | त्रपति स्वामि रुपानिधी |
| ळ प्रधान | तस्य श्री नीवास पर |
| | शुराम प्रतिनीधी |
| (कोयरी त्रिपदी शिक्का) | ( लंबवर्तुळी दुपदरी शिक्का ) |

**शाहु छत्रपति** याणी देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रा **व्याघ्रगड** यासी आज्ञा केली येसि जे **दिवाकर गोसावी** परंपरा श्री——स्वामी यांस प्रांत मजकुरी इनाम होता जमीन चिवे

\+ + बिघा———

ता कुडाल जमीन मौजे सायगाव

·।१० आखाडे ता मेढ जमीन चिवे

·।१० बाम्हणोली ·॥-

·।१० मौ भिवडी

———

१८

येकुन दीड चावर इनाम होता तो हाली त्यांचे नातु **दिवाकर गोसावी बिन बहिरंभट** यास करार करून दिल्हा आहे तर तुम्ही सदरहू जमिन देह मजकूरपैकी कुलबाब कुलकानू याचे दुमाला करू(न) इनाम चालवणे प्रति वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रति लेहून घेऊन हे मुख्य पत्र भोगवटियास परतोन देणे जाणिजे लेखनालंकार ( शट्कोनी दुपदरी मोर्तब ) मर्या

देयं‌रा

जते

| *रुजु | संमत | सां | सां |
|---|---|---|---|
| | सुमंत | मंत्रि | सरकार |
| | सुद | सुरुसुद | बार बार बार बार |

———

ले. २४ } श्री श्री मेरुलिंग { श. १६६५ इ. १७४३

॥ श्री. चिरंजीव राजेश्री **रतनोजी ताऊजी देसाई** प्रा **कुडाल** यासी प्रति **तुबाजी नाईक देसाई** प्रा मजकुर आसीवाद सुर सन आर्बा

*सर्व अक्षरें निराळीं.

गोल शिक्का आर्बैन अलफ उपरि तुम्ही भाऊपणाच्या वाटीयाचे विशई बोली केलीर
श्री तरी येणेप्रमाणें तुम्हास वडिलानी वांटा करून समजाविले आहे बिा
तुबाजी + +
+ + + + +

का कुडाल्ल इनाम व हकदारी व कुलबाजबाच हक आपण खातो त्यामधे तिसरा वाटा तुम्हास दिल्हा असे

श्री यात्रेचे उत्पन वाटा तिसरा घेत जाणे

घाट अलेवाडी वाट मेढियाकडील उत्पन तुम्हाकडे

बाजार मौजे वाळुत येथील तुम्हाकडे नीमे व आम्हांकडे निमे

कसबाच्या बाजाराचे उत्पन तिसरा वाटा घेत जाणे

राजेश्री तिमाजी नाईक यासी इनाम पातशाहानी दिल्हे आहे नवे मालुमात वावारे त्यापैकी निमे आपणास व निमे तुम्हास दिल्हे आसेत

देहे वाटा
१ हुमगाऊ
१ बाम्हुणली
१ सोकरुडी
१ वाळुत
१ सनपाने
१ हातगे घर
१ इदोली
१ राणगे घर
१ मारली
१ आलेवाडी
१ करदी
१ करदोसी
१ सांगवी
१ महिगाल
१४

पानमान तश्रीप आधी आमची मामे तुमची घेत जाणे

चवदा गावचा देस चौगुलकीचा हाक निमे आम्ही व निमे तुम्ही घेत जाणे

येणेप्रमाणे लेकराचे लेकरी तुम्ही खावे यास १ भाऊपणामधे कोण्ही पुढे कटकट करील त्यासी श्रीची व वडिलाची शफत आसे सके १५५७ शारवरी नाम सवछरे श्रावण शुद्ध प्रतीपदा ब+ कागद सही

बीा

माभली आज ाा देसकुलकर्णी व गावकुलकर्णी प्राा मजकुर

बोपाजी त्रिमल व मुधो हणमाजी देशकुलकर्णी व गावकुलकरणी पाा माा

---

१ शक व संवत्सर नाम वरील सुहुरसनांशीं जमत नाहीं व शकांकाशी संवत्सर जमत नाहीं

गोही

वेंकटाद्र तिमाजी दफ्तरदार किले चदनगड जाखो त्रिमल वस्ती किले चदनगड

---

ले. २५ } श्री { श. १६८५ वैशाख शु. २
इ. १७६३ एप्रिल १५

श्री राजाराम
छत्रपती रुपानिधी
नारो शंकर पंडित
प्रतिनिधी

( अष्टकोनी तीन पदरी
चार ओळींचा शिक्का )

अभयपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वास निधी राजमान्य राजश्री **नारोपंडित** प्रतिनिधी ताा मोकदमानीं मौजे **वेलवडे** ताा **कुडाल** सुाा सलास सितेन मया व अलफ तुम्हांस हुजुर **सातारियाचे** मुकामीं आणून आज्ञा केली जे मौजे मजकूरची साल मजकूरची खंडणी करणे त्यावरून तुम्ही विनंती केली जे गाव खराब पडला होता त्यास राजश्री **सदाशिवपंत** याणी कौल सादर करून वसाहत करून इस्तावा करून दिला आहे त्याप्रमाणें हालीं स्वामींनी रुपालु होऊन तह करार करून दिल्हिया लावणी उगवणीं करू म्हणून त्यावरून (मनास) आणून पेस्तर सालच्या आबादानींवर नजर देऊन मारनुले याणीं कौल दिल्हा आहे त्याप्रमाणें सालमजकुरीं कुलबाब कुलकानु जिल्हे व खालसा येकून दुतर्फा देखील सरदेशमुखी व नाडगौडी व साहोत्रा नख्त रुपये

१०० बाा रुजु गुदस्ता
५० इस्तवा साल मजकुरीं जाजती
———
१५०

येकून दीडशें रुपये करार केले असेत याची साल मजकुरी उगवणीं व पेस्तर सालची लावणीं करून सुखरूप राहाणें ज्याजती जलल होणार नाहीं अभय असे जाणीजे
* छ १ शोवल निदेश समक्ष लेखन ( अष्टकोनी मुद्रा )
सिमा
सुरु सुद बार

---

* येथून पुढील अक्षर निराळें.

ले. २६

श्री

{ श. १६९५ भाद्र. वद्य ९
{ इ. १७७३ सप्टं. १०

○ श्री ०
आई आदि पु
रुष श्रीराजाराम
छत्रपति स्वामी कृ
पानिधी तस्य भग
वतराव त्र्यंबक
प्रतिनीधी

( अष्टकोनी तीन पदरी सात ओळींचा शिक्का )

आज्ञापत्र राजश्री —— पंतप्रतिनिधी तां मोकदमानी मौजे **पानस** ताा **बारामुरे** सुभा प्रांत **जावली** सुाा आर्बा सबैन मया व आलफ मौजे मजकुरी वेदमूर्ती राजश्री **आनंतभट बिन चिंतामणभट माभलेस्वरकर** याजकडे जमीन चिरे ०१६ सोला पेसजीपासून ईनाम चालत आहे त्यास पूर्वीपासून चालत आहे त्यागा भट मारानिले याजकडे जमीन चालविणे छ २२ जमादिलाकर*निदेश समक्ष राजते

लेखना

( अष्टकोनी मुद्रा ) वधी

*वार

---

ले. २७

श्री

{ श. १६२७ आश्विन वद्य १४
{ इ. १७०५ आक्टो. २९

राजश्री —— सुबेदार व कारकून हाल ईस्तकबाल सुभा प्रांत **सातारा** गोसावी यांसी

॥छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य —— सेवक **रामचंद्र नीळकंठ** अमात्य नमस्कार सुहुर सन इहिदे मया व अलफ वेदमूर्ती **दिवाकर गोसावी माहाबले-स्वरकर** यांसी पूर्वी राजश्री —— कैलासवासी स्वामीनी मौजे **अवकाली** ताा बारामुऱ्हे हा गाऊ सर्वमान्य कुलबाब कुलकानु ईनाम दिल्हा आहे येसियास वेदमूर्तीने **विशाल-गडचे** मुकामी राजश्री **श्रीकराचार्ये पंडितराऊ** या संनिध येऊन विदित केले जे मौजे मजकूरचे पाटील व त्याचे बापभाऊ अवघे हशमामधे चाकर जाहाले सनदा घेऊन येऊ लागले सनदा मजुरा देता आपणास काही न पावे यैसे जाले तेणे करून आपला योगक्षेम चालत नाही तरी त्या गावांचा मुयादला हर येक गावी जमीन नेमून दिल्ही पाहिजे म्हणून विदित केले त्यावरून त्याणी जमीन नेमून दिल्ही चावर

* अक्षर निराळें.

·।१० मौजे अखाडे ता। कुडाल
·।१० मौजे भिवडी ता। कुडाल
·।१० मौजे बाम्हणोली ता। कुडाल
१८

येकूण येक चावर जमीन नेमून दिल्ही असे अलाहिदा सनद सादर आहे त्याप्रमाणे जमीन अवल दूम सीम विसां पांडाच्या बिधीयानें मोजून चतुसीमा करून पडी जमीन नेमून देऊन ईनाम यांस व यांच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे प्रतीवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे तालिक लेहून घेऊन असल सनद वेदमूर्तीजवळी भोगवटीयास परतोन देणे जाणीजे छ २७ जमादिलोवल* निदेश समक्ष लेखन (गोल सीमासमु मुद्रा)

लसति

(मागील बाजूस एका जोडावर मुद्रा दोनदां उठविली असून कागदाच्या मधोमध बार आहे. शिवाय रामचंद्र नीळकंठाचा शिक्का आहे.)

---

ले. २८ } श्री {

श्रीसकलगुणपरिपुण निर्गवी यासि माहाराज राजमान्य राजे समस्त माभलेस्वरकर गोसावी नाति की

सेवक **गोविंद प्रभु देसकुलकरणी** व **पुतलाजी प्रभु** व **गोविंद प्रभु** चिटणीस दोनी कर पायावरि मस्तक ठेऊन दडवत विनति उपरि लेहावया कारणे यैसे जे गुरु गोसावी पूर्वी येथे येत होते आणी आता त्याचे (?) नावे करून दुसरा खासा आ + + + + वेदमूर्ति **केशवभट** + + + + + + + + + + जेथे आ + + + + + + की आम्ही गुरु गोसावी या + + नातु आहे आणीक कोण्हासि (स) मध नाही तरी तुम्ही त्याचे वर्तमान काये आहे तरी त्यास येथे पाठऊन देणे बहुत काय लिहिणे हे विनंति

---

ले. २९ } श्री {

श्री * अंबा प्रसन्न (बाळबोध)

राजमान्य राजश्री **बहिरोपत** गोसावी यास सेवक **महादाजी बापुजी** नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जागून स्वकीय लिहित जाणे विशेष राज(श्री) **दिवाकर**

*अक्षर निराळें.

**गोसावी** याचा इनाम पहिलेपासून + + **बाम्हणोलीस** आहे त्यास साल मजकुरी यानी स(त)तर बसरीक ठेऊन कर्जवाम देऊन थोडा + + ईनाम लाविला आहे व पुढे अणखी सरीक + + लावितील त्यास त्याचे चालवणे आम्हास अगत्य तरी तुम्ही त्याच्या इनामाची माध्यस्ती काही उपसर्ग आपले तर्फेचा व आणखी कोणाचा न लागे ते देखून याचे पुत्र **गोपालभट** आप(ले) गावींहून मौजे मजकुरास येतील तेंव्हा इ (ना) मा चा चेवज होईल तो सरीकाकडून झाड्यान(सां) त्याचे पदरी घालवणे येविशी आतर पडो न + + जाणिजे बहुत लिहिणे नलगे * हे विनंती

---

# बेलसर–गरुड

ले. ३० } श्री गणेशा... { श. १५७५ वैशाख शु. ९
{ इ. १६५३ एप्रील २६

श्री सके + + + + विजये नाम संवतसरे वैसाख सुद नवमी ९ मगलवार तदिसीं हाजीर मजालसी **तुकोजी** मोकदम व सभ्ये स + + मार्थ माहास्थळ माहाप्रसणीक बिहुजूर गोतथल मौजे **सीकारपूर** ना **तलेगौउ** ता पाटस सा जुनेर सुा आर्बा खमसैन आलफ सन हजार १०६३ यां विद्मान अग्रेवादी **काऊजी** व **खडोजी गरुड** मौजे **बेळसर** + + सासवड हाली वस्ती मौजे **मुग्दई** सा मजकूर पछमवादी + + **जी माली** मौजे बेलसर का मजकूर हे हर दो जण मौजे **बेलसर** येथील मोकदमी-बदल भाडत होते यावरी गोते इनसाफ मनास आणितां तों दोघेहि खावद अग्रवादी व पछमवादी हाजीर (थ) ली नाहीत खावदाचे बापभाऊ हाजीर थली जाले तरी गोतपती नेमउतरे केली जे वैसाख[1] सुद पंचमी ५ आखतीज जाली + + + पंचमीस* सुक्रवारी हरदो + + वादी खावद हाजीर करावे **काउजीने** व **खडोजी वरुडे भिकाजी गराडराऊ** खावद त्यास हाजीर करणे व **हरजी माली** याने **माउजी माली** खावद त्यास हाजीर करणे येसीं येरुन-येराचे नेमउतरें लेहोनु तह केला जें या नेमास जो उभा थली न व्हाये तो मोकदमी वेगला अर्थाअर्थी मोकदमीस तुटला आस व दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा आन्याई येसा तह केला व माली यानी दिवाणीचे कौलु व देसमूख व बारा बलुते व साटी प्रजा समेत थला हाजीर होणे आणी **गरुडास** गावावरी नेउनु हर दोजणी कीर्द करणे मग पाढरीवरी हाकी(म) व गोत जो निवाडा करितील तेणेप्रमाणे वर्तणे येणेप्रमाणे + लाज केला होता यावरी काउजी गरुडें

---

* अक्षर निरनिराळें. १ ता. २२।४।१६५३

**भिकाजी गरुडराऊ** त्यास हाजीर केले व **हरजी माली** याने **माउजी माली** यासि थलास मुदतीस हाजीर केले नाहीं व हरजीहि हाजीर जाला नाही मुदतीस खोटे माली जाले पहिलेहिं साल मजकुरोमधें माली यानी व गरुडें मौजे मारीचे थली नेमउतरे लेहोतु दिधली जे फालगुण जालियां गुढीयाच्या पाडिवां हर दों वादी यानीं मौजे मारी थलास मुदतीस उभे राहाणें व गरुडीं खताख्यानती दावा न करावा व माली यानीहि निवाडा जालिया वेगला मोकदमीचा हकलाजिमा नेघावा व होळीस पोळी बांधावी ना यैसे येणे प्रमाणें गोताचे घरी लेहोतु दिधले यावरी यैसी नेम उतरे केली यासि जो चुकेल तों दिवाणीचा गुन्होगार गोताचा खोटा आर्थाआर्थी मोकदमसि तुटला यैसा तह केला होता यावरी माली यानी होलीस पोली बाधली व बाजे हक लाजि(मे) घेतले व मुदतीस हि थली उभे राहिले नाहीत यैसे हर दो वख्ती माली मुदतीस खोटे नेमउतरा बरहुकूम जाले तरी माली हरजीचे आगी लाविले व हाली हि नेमउतराहुकू ( म ) वर्तले नाहीत मुदतीस हाजीर जाले नाही **काउजी** व **खंडोजी गरुडे** हर दो मुदतीस भिकाजी गरुड खावद त्यास हाजीर केले व हाली मुदतीस **भिकाजी गरुडराऊ** खावद त्यास थलास उभे केले व ख्यानती दावा केला नाही तेही **हरजीचा गरुडांचा** मुकाबला पाहि(ला) आता हाली नेमास रोज ४ च्यारी वाट पाहिली मग पाचवे रोजी गरुडास कागद लेहोतु दिधला असे तरी सदरहू हर दो मुदतीस माली गैर माकुल वर्तले व गरुड हर दो मुदतीस नेमउतरा बरहुकूम वर्तले तरी जैसा वाका होता तैसा आम्ही गोतपतीने लेहोतु दिल्हा असे हे लिहिले सही कागदी वोली ४८ अठेतालीस*

| | |
|---|---|
| +<br>बाजी गव्हाणा मोकदम<br>कार गौली भुर्क | + उजो देऊकर मौजे सिकार<br>पूर |

---

* कागदाची लिखावट अगदीं शिवकालीन आहे. त्यांत अनेक जागीं मूळ मोडींत कोठें वेलांटीच्या मुकुटांत अनुस्वाराचें भरींव चिन्ह काढलेलें आहे. कागद फार जीर्ण झाल्यामुळें घरगुती संस्कारानें गांवठी डिंकानें चिकटाचिकटी केल्यामुळें मध्यावर व अन्यत्र ओळीला ओळ व अक्षराबरोबर अक्षर नीट काळजीनें जुळविलें नाहीं. कांहीं ठिकाणीं अक्षराखालीं अक्षरें दडपलीं आहेत. कालाबद्दल पाहतां मूळांत शकाचा आंकडा फाटूनच गेला आहे. हिजरी सनाच्या आकड्यांतील शेवटचा आकडा फाटून किंवा दबून गेला आहे. शकाची निश्चिति आपणांस येथें अवांतर तपशीलावरून करितां येते. विजय संवत्सर, वैशाख शुद्ध पंचमी शुक्रवार, नवमी मंगळवारी या सर्व योगांवरून शक १५७५ ठरतो. खरेजंत्रीप्रमाणें हे सर्व योग बरोबर जुळतात. पण पत्रांत जो सुहुर सन दिला आहे तो म्हणजे अर्बा खमसैन अलफ हा, शक १५७५ च्या वैशाखांत खरेजंत्रीप्रमाणें येत नाही. तो जेष्ठांत सुरु होतो. या अडचणीचा परिहार शोधला पाहिजे.

भिवरथडी + +
( पाठीमागे ) कृष्णाजी निंबालकर मौजे सिकारपूर

बिा बाप जोसी कुलकर्णी मौजे मजकूर

---

ले. ३१ } श्री { श. १६१५ श्रावण शु. ६ / इ. १६९३ जुलै २८

छ मा अनाम हवालदार व कारकून व देशमूख व देशकुलकर्णी ता **सासवड** यासी **संताजी घोरपडे** सेनापती जफ्ततन मुलुक सुहूर सन आर्बा तिसैन अलफ **गोदजी गरुड** बिन **खंडोजी गरुड** हे हुजूर येऊन विदित केले की आपली मोकदमीचा कथला मौजे **वेलसर** परगणे मजकूर येथें आहे **माली** बलेच मोकदमी खातो तरी देशमूख व देशपाडे व **मालजी माली वेलसरकर** हुजूर आणून गोतमुखे बरहक मनसुफी केली पाहिजे त्यावरून **माउजी जगथाप** व **भगवंत कासी देशपांडे** पा मा व **फिरगोजी पाटील** कसबे **सासवड** व **मालाजी माली** याचा पुतण्या **रामजी माली** मोकदमी खातो यास हि हुजूर आणिले करिना मनास आणिता **गोदजी गरुड** याने आपली हकीकत जाहीर केली की आपण दिव्य केले ते महजर आपणापासी आहेती त्याच्या तालिका होत्या त्या दाखविल्या यैसे असोन माली मजकुराने आपले मारे कायेबदल केले हे मनास आणिले पाहिजे त्यावरून माली मजकुरास करिना पुसता **रामजी** म्हणो लागला की आपणामध्ये व गरुडामध्ये दिव्य जाले नाही अगर मारे जाले नाहीत यैसे बोलिला हे गोष्टीचे कतबे लेहून मागितले **गोदजी गरुड** याने बोलिल्याप्रमाणे कतबा लेहून दिधला **रामजी माली** याने कतबा लेहून दिधला की आपणामध्ये व गरुडामध्ये दिव्य जाले **गरुड** खोटे जाले आपण खरा जालो म्हणऊन कतबा लेहून दिधला यैसियास पूर्वील बोलास तकरीर तंतल दिसोन आली त्यावरून रामजीसि सागितले की आपले कागदपत्र व वडील धाकटे भाऊबंध घेऊन येणे कोणावरी जुलूम जाजती करणार नाही म्हणोन निरोप देऊन हर दो जणास जमान घेऊन गोत नेमून दिधले त्यास गोतापासी **रामजीने** दाहा दिवसाची मुदती कागदपत्र वडील धाकटे आणावयास मागितली आणि रामजीने आपला भाऊ व माहार गावास पाठविले आणि आपण आठ दिवस हुजूर हाजीर होता नववे दिवसी पलोन गेला यावरी गोताने सदरहू मुदती जाऊन नव दिवस जाजती वाट पाहिली नवे दिवसी **गोदजी गरुड** उभे राहिला की आपणास काये रजा त्यावरून देशमूख व देशपांडे यास पुसिले की गरुडास काये सांगता त्यावरून देशमूख व देशपांडे बोलिले की गरुड आपले हाती

( येथें संताजी घोरपडे यांची सहा ओळींची अस्पष्ट वाटोळी मुद्रा आहे)

4766

देणे गावास जाऊन आपले गावकरी व वृधवृध जमा करून **गरुडास** व **माली** यास सागोन जरी माली व गरुड आमचे नाईकत तरी हर दो जणास गोतापासी घेऊन येऊन जोपरंयेत यांचा निवाडा होये तोवरी हर दो जणाकडून कीर्दी करऊन म्हणून देशमूख व देशपांडे यानी सदरहू करिना गोतापासी लेहून देऊन गरुडास हाती घेऊन घेऊन गेले आहेती तरी तुम्ही हर दो वादीयाकडून रयेताव्याप्रमाणे कीर्दी करवणे आणि हर दो जणाची मुनसिफी गोतमुखे होऊन निवाडा होये तोंवरी मोकदमीचा हकलाजिमा नागर अमानत करणे लिहिलेप्रमाणे कोणाची रयात मुरवत न करिता वर्तणूक करणे* जाणिजे* छ ४* जिल्हेज विलस (अष्टकोनी तीन ओळींचा
ति लेखना अस्पष्ट शिक्का)
वधि:

---

ले. ३२ श्री (श. १६१५ श्रावण / इ. १६९३ आगष्ट)

छ. मा। अनाम हवालदार × (व कारकून व देशमूख व देशकुलकर्णी का। **सासवड** यासि **संताजी घोरपडे** सेनापती जत्कतन मुलक सुहुर सन आर्बा तिसैन व अलफ मौजे **बेलसर** ता। मजकूर येथील मोकदमीचा गर्गशा **मालजी माळी** व **गोंदजी गरुड** यात लागला होता त्यानिमित्य हर दोजणास हुजूर आणून करिना मनास आणिला त्यास गरुडानी आपले पहिल्या निवाड्याचे कागदपत्र दाखविले माळी म्हणो लागले की आपले भाऊबंद वडल गावी आहेत त्यास दाहारोजात आणवितो म्हणौउनु नेम केला त्यास(प्र)नेमाणे गरुड हाजीर जाले माली मजकुराचे भाऊबंद हाजीर केले नाहीत आणि **मालजी माली** न पुसतां पळोन गेला याकरितां मौजे मजकूरची पाटिलकी अमानत करून हे आज्ञापत्र तुम्हास पाठविलें आहे तर तुम्ही मौजे मजकूरची मोकदमी अमानत करून दिवाणचा मुतालीक येऊन मोकदमीचा हकटक व इनाम जमा करणे आणी हर दोजणांचे कागदपत्र पहिले आहेत ते गोतात आणऊन गोतमुखे मनास आणून करिना लेहून घेऊन हर दोजणास हुजूर पाठवून देणे करिना मनास आणून जो वतनास खरा होईल त्याचे दुमाला मोकदमी करून तुम्हास आज्ञापत्र सादर करून तेणेप्रमाणे वर्तणूक करणे कोणाची रयात मुरवत न करणे धर्मता करणे + + + सेतभात जे असेल ते रयेताव्याप्रमाणे कौल देऊन चालवणे मोकदमीचा नांगर दोघांच्या मना करणे × × × × न देणे जाणिजे छ × जिल्हेज × × ×

(समासात: श्रीराजा राम भक्तस्य ज फत्नमुल कस्य च संताजी (अस्पष्ट ले. ३१ प्रा।))

---

* अक्षरें निरनिराळीं.

ले. ३३ } श्री { श. १६१६ आश्विन वद्य ९
इ. १६९४ आक्टोबर २

श्री शंकर*

( संताजी घोरपडे ह्यांची अस्पष्ट वर्तुळी मुद्रा )

आज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विस्वासनिधि राजमान्ये राजेश्री **संताजी घोरपडे** सेनापती जफ्तनममुलुक ताा नाइकवाडी व काा **सासवड** सुा खमस तिसैन अलफ माा **गोंदजी गरुड** पाटील मौजे **वेलसर** यात व माळी यात पाटिलकीचा गरगशा लागला आहे त्याचा निवाडा करणे म्हणोन देसकास कागद लिा आहे तरी तुमी ठाण (!) नाईक व दाहाजण हमशाई पाटील मिळोन धर्मंता निवाडा करणें जो खरा असेल त्याचे हाते पाटिलकीचें काम घेत जाणे खोटा असेल तो हुजूर पाठवणे याउपरी त्याचा कथला वारला तर बरे नाहीतरी मग, आम्हास बोल नाही देसक व गावी पाटिलकी करिती ते दगा खातील ऐसे बरें समजणें आणि बरहक निवाडा करणे जाणिजे राा छ २२ सफर मोर्तबसुद ( येथेंच अक्षरावरच मोर्तब वर्तुळी उठविला आहे )

---

ले. ३४ } श्री { श. १६२३ आश्विन शु. १०
इ. १७०१ सप्टें. ३०

तालिक

महजर व तेरीख छ ९ जमादिलवल सुा इसने मया आलफ शके १६२३ वृशा नाम संवत्सर आश्विन सुध १० दशमी त दिवशी हाजीर मजालसी समस्त राजमुद्रा लस्केर समस्त मौजे **भाठघर** ताा **वेळवंडखोरे**, येथे मुा केला होता समस्त राजमुद्रा बिहुजूर मजालसी

राजश्री शंकराजी पंडित सचीव
राजश्री मल्हारराऊ दादाजी सरलस्कर
राजश्री बजाजी नाा देशमूख प्राा फलटण
बलवंतराऊ देवकाते मोकदम मौजे कन्हेरी प्राा सुपे
विरोजी कांकडे माो मौजे निंबुत व पांगारें
राजश्री जयेसिंग जाधवराऊ सेनापती
राजश्री संताजी जाधवराऊ
सुभानजी गोंडे अरोळे माो मौजे सीरसोफळ प्राा सुपे
गणोजी बिन बाळोजी जाधव माो काा परिंचे

या हुजूर आपवादी **गोंदजी गरुड** व पशमवादी **तान्हाजी जगथाप** माळी य

---

* शंकर हीं अक्षरें भिन्न असून ती संताजी घोरपड्याच्या हातचीं असावीं. पत्र अस्पष्ट आहे.

हरदोजणामधे मोकदमी मौजे **बेलसर** का सासवड येथील कथला लागला होता यावदल पेसर्जी हजुरून रा **जाणो विश्वनाथ सरसुभेदार प्रा पुणे** यांस आज्ञापत्र सादर केले होते की प्रांत मजकुरीचे हक जवारीचे गोत मेलऊन हर दो जणाचा करिना मनास आणून बरहक निवाडा करणे यावरून मशारून इलेनी प्रांत मजकुरीचे गोत मेळविले बितपा

का सासवड————————

| | |
|---|---|
| माउजी ना व कनकोजी ना देसमूख का मा | |
| चांदजी पा व शकराजी जगथाप का मा | |
| देशकुलकर्णी का मा | सून्याजी पा झेंडे मौजे दिये |
| रखमाजी पा व दादजी कामथे मौजे खळद | कोयाजी रण नवरा मो मौजे रांक |
| पुजाजी पा वडधे मो कोढीत | गोद माली मौजे दिये |
| दताजी बिन गणोजी जगथाप बिरादर देशमूख का मजकूर | सताजी बिन नाइकजी बिरादर मो का मजकूर |
| रुस्णाजी बिन दस माहाला का मजकूर | निलोजी बिन भिकाजी जिन-गर का मा |

प्रा सुपे————————

| | |
|---|---|
| रेखोजी पा मो कोथले | कान्होजी लांडा चौगला कोथले |
| कावजी पा कांबिथा सिवरी | सिवजी पा उसीर सिगापूर |
| मांवजी पा टिलेकर पेठ याकुदपूर | |

प्रा पुणे————————————

| | |
|---|---|
| पुतळाजी पा मेमाणा मौजे पारगाक | कृष्णाजी पा दरेकर आहिले |
| राजजी व रखमाजी मो पिसारवे | मोरोजी पा चांबेली |
| माणकोजी व भिलोजी पा कुंजीर वाघापूर | गोंदजी सिंगाडा चौगुला गुन्होली |
| जानोजी पा कुंभाकर वणपुरी | सूर्याजी पा मो आलदी |
| बादजी पा बैला मौजे खानवडी पेठ | खडोजी पा चावीर |
| मो नारायणपूर | मो बालूज मौजे अलदी |
| मालजी | |
| मालाजी ना राम वर्सी | लतीब खान दुरो-सी बा |

सदरहू गोत मेळवून मौजे दिये का **सासवड** तेथे बैसोन हर दो जणाचा करिना मनास आणून राजीनामे व तकरीरा घेतल्या————————

तकरीर कर्दे **गोंदजी गरुड** अग्रवादी याणे तकरीर केली यैसी जे वैरान मुलुक होता ते वख्तीं मुकासी साहेब **मलिक नैब** व **शाहाभाई खोजे** सदेस बैसोन देसमूख देशकुळकर्णी मोख्तसर बारा गावींचे यास बोलाऊन पातशाही हुकूम वाचिला ते वख्ती बोलिले जागा जागा चारणकरु वाडे घालून बैसले आहेत त्यास बोलाऊन आणणे त्यावरुन जे चारणकरु वाडे घालून[1] जे चारणकरु वाडे घालून[1] होते ते हाजीर जाहाले त्यांस हुकुम प्रा दिवाण बोलिले जें त्यांस हुकूम प्रा वतन करून देऊन कीर्दी आबादानी करणे ते वेलेसी **विठोजी** व **माहादजी गरुड** उभे राहिले आर्ज केला आपणास वतन करून दिल्हे पाहिजे म्हणऊन आर्ज केला त्यास देशमूख व देशकुलकर्णी याणी दिवाणास आर्ज करून मौजे **वेलसर** येथील मोकदमीची सनद करून दिल्ही सींवधारा पेंडवला घालून दिल्हा बारा बलुते मेळऊन गाव आबाद करून हक-लाजिमा खाऊ लागले यावरी **बहिरजी गरुड** मोकदमी करीत होता त्यावेरी **बाबाजी गरुड** मोकदमी करीत होता तो म्हातारा जाला कसाला उरकेना याबदल **मावजी माली जगथाप** व **काऊजी माली** हे दोघे भाऊ होते ते मुतालीक ठेविले **बाबाजी**चे लेक **मलिकअंबर** साहेबापासी चाकरी करीत होते ते जुंझी पडिले खबर गावास आली माली यानी दुखवटियाचे जेवण केले

तकरीर कर्दे **तान्हाजी विन जग-—थाप** पछमवाडी याणे तकरीर केली जे मौजे मजकुरीची मोकदमी सुपे परगणियाखाले गाव होता तैंपासून आपला वडील रामजी मोकदमी करीत होता त्याचा लेक होनोजी याणे मोकदमी केली त्याचा लेक बाळोजी याणे मोकदमी केली त्याचा लेक मावजी याणे मोकदमी केली त्याचे वेलेस सासवड कर्याती जाली गांव सासवडा-खाले वोढों लागला ते वेलेस मावजीचा लेक मालजी करीत होता त्याचे वेलेस तिखट वाणी **इंदापूर** येथील सुखवस्तीने होता यैसियास आपले गावचिे सिवेचे व जेजुरीचे भाडण पडिले ते वेलेस तिखट वाणी याचा भाऊ पडिला त्या-बदल तो खुनाचा वेव्हार सागों लागला त्यास गांवकरियानी सांगितलें कीं सिवेचे भांडणी गांव्हालीमधे खून जाला त्याचा वेव्हार साधत नाही त्यावेरी गावकरियाची व तिखट वाणीयाची समजावीश जाली वाणियाने गांवकरियांसी जेवावयास केले आणि कुसुर करून मारेकरी आगून घरात माल्ल्यावरी ठेविले आपले भाऊ-बद आवघे जमा होऊन त्याच्या घरास जेवावयास गेले चूल भरिते वेळेस कुण-बीण तिखटाची तिसी आपला येक जगथाप जात होता तिणे सांगितले जे तुम्हास मारेकरी आणिले आहेत सावध होणे त्यावरून त्याणी सूचना आवाधियांस केली जेविता माघारे परतले ते वेलेस मारेकरी धावोन मारामारी केली ३५.

---

१ मुळांत हें दोनदां पडलें आहे.

ते वेळेसी ४२ बेतालीस माणूस मारिले आपण पळोन गेला दरवडा पडिला म्हणऊन नाव केले माऱ्याबदल गांव वोस जाला देशमुख व देशकुलकर्णी याणी कौल देऊन गांवास आणिले **विज्यापुरी सवाजी गरुड** होता त्यास खबर कळली तो तेथून गावास आला त्याणे पुसिले जे तुम्ही मुतालिक गांवात असता मारा कायेबदल जाला त्यास त्याणी फिरोन जाब दिल्हा कीं तुह्मा मुतालीक कोण आपण खावंद आहों त्या दिवसापासून वेव्हार लागला मग भांडत देशमुखापासी ठाणा गेले तेथून **मिरासाहेब** पुणा होता त्याजवळी उभे राहिले तेथून खुर्दखत घेऊन मौजे **बेलसरीचे** पांढरीवरी श्री सिधेश्वरापुढें दिव्य केले खरा जाला हाती पिसवी घालून श्रीच्या दर्शनास जेजुरीस गेले तेथून **सांकुर्डियावरून सिवरीस** गेले तेथे **येमा माहार** व दोघे कुणबी घेतले व **सदुभाई** व **मिराभाई** बराबरी घेसे सासवडास जाता वाटेस खल्लदीच्या रानात चिंचालियाजवळी मालिचानी दबा धरून **सवाजी गरुड** मारिला यावरी कोण्हीयेक दिवस वेव्हार राहिला त्यावरी **विज्यापुरी याकुदखानाजवळी** वेव्हार मागितला तेथून माली गैरहाजीर जाला यावरी **बाजी नाईक देशमूख** व **रामाजी त्रिमल देशकुलकर्णी** का **सासवड** याणी हाती धरून गावास आणिले त्यावेरी विल्हे करावी ते केली नाही त्यावेरी पंचतीस खून आपले केले आणि[1] तिख़ट[1] वाणी[1] याची माणसे पुढें घालून घेऊन गेले आणि बाहेर पडोन दावे करू लागले त्यास दावा होइना म्हणऊन **सवाजी** गरुडाच्या बापास दावा विकिला ते वेळेसी **नरसोजी** मोकदमी करू लागला त्यासी **सवाजी गरुड** वेव्हार सांगों लागला **मिरांसाहेब** पुणा होते त्याणी नरसोजी तलब करून पुणियास नेला हरदूजणाच्या करिना मनास आणून **सवाजी गरुडास** पुसिले कीं तू गोतास राजी की दिव्या राजी होतोस म्हणऊन विचारिले **सवाजी** दिव्यास राजी जाला त्यावरून **सासवडास** ठाणा पाठविले खुर्दखत सादर केले कीं मौजे **बेलसरीचे** पांढरीवरी जाऊन **सवाजी गरुडापासून** दिव्य घेणे त्यावरून देशमूख व देशकुलकर्णी हक जवारी गोत मेल्लऊन पांढरीवरी दिव्य केले हाती पिसव्या घालून सासवडास नेला तेथून पुणियासी **मिरां** साहेबापासी नेले हात पाहिला तों **सवाजी** दिवीं लागला खोटा जाला **नरसोजी** खरा जाला म्हणऊन **सासवडास** पाठविला सासवडी महजर करून देऊन पांढरीस पाठविला कांहीयेक दिवस मोकदमी केली तो मेलियावरी त्याचा लेक **बाळोजी** मोकदमी करू लागला ते वेळेस मागती सवाजी दावे करू लागला सासवडीच्या केळी व आंबे तोडिले सुड्या जालिल्या व धरणे फोडिली व मौजे मजकुरीच्या सुड्या जालिल्या व ४ खून केले त्यावरून ठाणाहून हुकूम केला

१ हे तीन शब्द दुबार पडले आहेत.

मौजे **गाधाडी ऊर्फ सिकरापूर तेथे** उभे राहिले वेव्हार केला तेथेहि माली गैरहाजीर जाला त्यावेरी राजश्री छत्रपतीस्वामीचे कारकीर्दीस रा **बाजी घोलप** हवालदार व रा **त्रिंबक गोपाल सुभेदार** प्रा **पुणे** या सनिध वेव्हार केला परतु निवाडा जाला नाही त्यावेरी कारकीर्दी मोगलाई **तुळापुरी** होते त्याचा हुकूम आमीन **कर्डे** व **सासवड** या दोही माहलास होता त्यास आणिला त्याणे **नावजी माळी जगथाप** त्यास जवली आणून करिना मनास आणावा तो तेथून नावजी गैर हाजीर जाहाला त्यावेरी रा **सताजी घोरपडे** याणी आपल्यासी बोलाऊन जमानता करून गोत दिल्हे तेथून **रामजी** गैर हाजीर जाला त्यावरी **मांवजी** ना देसमूख व **भगवंत कासी** देकुशलकर्णी का मा याणी हाती धरून का मजकुरास आणिले परतु विल्हे केली नाही यावेरी रा **नरहरी आवादेऊ** सुभेदार प्रा पुणे त्यापासी उभे राहिले परतु निवाडा जाला नाही येणेप्रमाणे तकरीर सही

कीं गरुड दावे करितो त्यास जपोन धरणे त्यावरून जपोन धरिला आणि ठाणा लेहून पाठविले तेथून **सदुभाई** व **अलिभाई** नाईकवाड आले त्याणी **सवाजी गरुडास** व **सताजी जगथाप** आपला या दोघांस हातखोडा करून नेत होते तो **खलदावरते** चिचालिया जवली सवाजी गरुडाच्या सोबतियानी दवा धरिला होता त्याणी खोडा फोडून **सताजीस** मारिले **सवाजी** गरुडास नेऊ लागले तो नाइकवाडियानी पाठीलाग केला सवाजीने फिरोन नाइकवाडीयासी दटावले त्यावरून नाइकवाडियानी बंदुखीचे गोलीने **सवाजीस** मारिले नाइकवाडी यानी ठाणा जाऊन सांगितले त्यावरून गरुड वेव्हार सागो राहिले त्याजवरी मागती राजेश्री महाराजसाहेबीं मौजे **पिंगोरी** ता **निरथडी** तेथे मुकाम केला होता तेथे **बाळोजी** पा व **महिपाजी** पा **जगथाप** यास हुजूर बोलाऊन जमानाची रजा फर्माविली ते वख्ती गरुड गैरहाजीर जाला त्यावरी आपला बाप **मावजी** पाटीलकी करू लागला ते वेलेसी **तलेगांवी** गरुड उभा राहिला जमानाबदल रजा घेऊन गेला तो आला नाही आपण गोताची रजा घेऊन गांवास आलो त्यावेरी कितेकां दिवसा राजश्री स्वामीचे वेलेस किले **पुरंधरी बाजी घोलप** हवालदार किले मा व **त्रिंबक गोपाळ सुभेदार** प्रा पुणे यासनिध वेव्हार केला तेथे गरुड खोटा जाहाला आपण खरा जालो त्याचे कागद कुल महजर **माधवराम** किलेदार **पुरंधरी**

मोगलाई याणे गाव लुटिला ते वेळेस कुल कागद गेले यावरी **तुळापुरीहून** हुकूम अमीन कर्डियास आणून आपणास तलब केली आपला भाऊ **नावजी** फडास गेला त्यास **आवरंगाबादेस** पाठवू लागला याबद्दल गैर हाजीर जाला यावेरी राजश्री **सताजी घोरपडे** यापासी आपला भाऊ **रांमजी** नेऊन जमान घेऊन गोत दिल्हे आणि सेंभरी होनाची तहसील गरडानी **जोगोजी गायेकवाड** याकडून लाविली त्यावरून तो तेथून गैर हाजीर जाला त्यावरि रा **नरहरी आवदेव** सुभेदार प्रा पुणे याजवली वेव्हार केला परतु गरुड खरा जाला नाही आपण आजी पावेतो मोकद्‌मी करितो हे तकरीर सही

हर दोजणाच्या येणेप्रमाणे तकरीरा मनास आणितां **मलिक आंबराचे** कार–कीर्दीचे कागद पुरातन गरडाजवली आहेत व खूनहि खरा जाला वेव्हारहि सादत गेला आहे अगदी तुटला नाही ऐसे गोताच्या मतें दिसोन आले याबद्दल पांढरी दों ठाई करावी ऐसा तह करून निवाडपत्र सदरहू गोताने केले त्यावरी लस्केराचा मुकाम मजकुरीं समस्त गोताचे माथा श्रीचे भंडार व बेल शफत घालून श्रीच्या भंडारासनिध उभे करून पुसिले कीं गरुडाची हकिकत कैसी आहे त्यावरून समस्त गोताने शफतपूर्वक भंडार माथा घेऊन सांगितलें की **गरुडा**जवली **मलिक आंबर** साहेबचे वेळेस मुलुक वैरान होता ते समई **मलिकजेब** व **शाहाभाई** खोजे मुलुक आबादानीस आले ते वेळेस गरुडास वतन करून दिल्हे ते सनद आहे व **सवाजी** गरडाने दिव्य केले हाती पिसव्या घालून श्रीच्या दर्शनास **जेजुरीस** गेला तेथून **सांकुर्डिया-**वरून **सिवरी**वरून सासवडास जात होता तो वाटेस खलदीच्या रानात चिंचा-लियाजवली **सवाजी** मारिला खरा जाला कीं नाही हें कांही कलले नाही इतकी हकिकत आपणास ठावकी आहे याखेरीज कांहीं आपणास ठावकें नाही म्हणऊन समस्त गोतानें साक्ष दिल्ही यावरी राजमुद्रा समस्तानी विचार केला कीं **जगथाप माली** यासी भोगवटाच मात्र आहे परतु सनदपत्र काही नाही **गरुडापासी** सनदाहि आहे व खूनहि जाला आहे आणि वेव्हाराचे झोंबडे वोढत आले आहे याकारणे समस्त गोतानें दों ठाई काली पांढरी करावी मोकदमी दों ठाई दोघानी करावी येणेप्रमाणे

हकलाजिमा दों ठाई खावा हा तह बराच केला आहे तरी सदरहू तह प्रमाणे **गोंदजी बिन खंडोजी गरुड** व **तान्हाजी बिन मांवजी जगथाप** हर दो जणी दों ठाई दोघानी मोकदमी करावी पडिले पान दों ठाई घ्यावे दिवाली दसरा मानपान होलीस पोली दोघानी बराबरी बांधावी सिराळसेटी बराबरी न्यावा दोघानी न्यावा तहप्रमाणे हर दो जणी वर्तणूक करणे हिला हरकती करील तो गोताचा आन्यााई व दिवाणीचा गुन्हेगार हा महजर *सही

---

ले. ३५ श्री शा. १६२३ माघवद्य ८
इ. १७०२ फेब्रु. ८
तालिक

राजेश्री **रामाजी बाबाजी** नामजाद व कारकून वर्तमान भावी सुबे प्रा **पुण** गोसावी यासी

॥छ अखडित लक्षुमी आलकृत राजमान्ये—सेवक **रामचद्र नलिकठ** नमस्कार सुाा इसने मया अलफ तुम्ही विनतीपत्र छ+ ११ रमजानीचे पाठविल ते छ† २१ रमजानी प्रविस्ट जाहले तेथ लिहिल की मौजे **बेलसर** ताा सासवड प्राा मजकूर येथील मोकदमीचे भाडण **गोदजी बिन खंडोजी गरुड** व **तान्हाजी बिन माव्रजी जगथाप माली** या हर दोजणामध लागले होते याकरिता याणी राजश्री **शकराजी पडित सचीव** यापासी जाऊन वर्तमान विदित केले की मौजे मजकुरीचा मोकदमीचा कथला आपला व जगथापाचा आहे तरी स्वामीने मनसुफी मनास आणून पारपत्य करावे त्यावरून त्याही **जानो विस्वनाथ देशाधिकारी** प्राा मजकूर होते त्यास लिहिले की या हर दो जणास गोत देऊन मनसुफी मनास आणून हुजूर लेहोन पाठवण म्हणऊन लिहिले होते त्यावरून रा। **जानो विस्वनाथ सुभेदार** प्राा मजकुरी होते त्याही या हर दूजणास गोत देऊन मनसुबी मनास आणिली थली निवाडा जाला की **गोदजी बिन खडोजी गरुड** याच वडील भांडत आले व मारे जाले आहेत परतु खरेखोटे यैस निवाडा जाला नाही **तान्हाजी मावजी जगथाप** पाटिलकी आजी पावतो चालवीत आहे गरुडा पासी **मलिकाचे** वेलच कागदपत्र आहे **जगथापा** पासी कागदपत्र काही नाहीत भोगवटा चालिला आहे याकरिता गोताने **गोदजी बिन खडोजी गरुड** यासी निमे पाटिलकी व **तान्हाजी जग जगथाप** यासी निमे पाटिलकी द्यावी व यैसे गोताने गोस्टी निवडिले गोदजी गरुड व तानाजी

---

*कागदास चार जोड आहेत.

+ माघ शु. १२ = ता. २९।१।१७०२ † माघ वद्य ८ = ता. ८।२।१७०२

जगथाप हुजूर आले व देसक व माकदम पाा माा हुजूर आणिले मौजे **भाटघर** ताा **वेलवड खोरे** येथील मोकामी राजश्री **जाधवराऊ सेनापती** व राो **मल्हारराऊ बाबाची सरलस्कर** व भले लोक बैसोन श्रीमार्तंडाचा भडार टेऊन देसक व मोकदम यासी पुसिल की हर दो जणाचा पूर्वीपासून कथला कैसा आहे थली तुम्ही निवाडा काये केला हे सत्य स्मरोन विदित करणे त्यावरून त्यानी भडार भडार सिवोन सागितला की गरुडाच मारे जाले आहे भाडण भाडतच आहेत परतु खरखोटे निवाडा जाला नाही मलिकाचे वेळेच कागदहि गोदजी गरुडापासी आहेत जगथाप भोगवटा खात आहे याकरिता गोताने निमे मोकदमी गोदजी बिन खडोजी गरुड यासी द्यावी निमे तानाजी मावजी जगथाप यासी द्यावी ऐसे निवडिले आहे म्हणऊन विदित केले व हर दो जणाचे करिने हि मनास आणिले यासी गरुडापासी मलकाच वेलच कागद आहे व मारे जाले आहेत भाडण आजी ताा भाडतच आहेत गोताने निमे मोकदमी गोंदजी गरडास द्यावी ऐसे केलें आहे त्यावरून गोदजी बिन खडोजी यासी निमे मोकदमी दिल्ही आसे आणि निमे मोकदमीचे दुमाले सनद गोदजीच्या नावची सादर केली आहे तेणप्रमाणे स्वामीनी मनास आणून आपली ही सनद सादर केली पाहिजे म्हणऊन तुम्ही लिहिले ते मनास आणु[न] राजेश्री **सकराजी पडित सचिव** येही करिना हर दो जणाचा मनास आणून गोदजी गरुडास निमे मोकद्मी मोकरर करून आपली स सनद दिल्ही आहे तेणेप्रमाणे मोकरर केली असे तो गो गोदजी गरडास निमे मोकदमी मौजे मौजे मजकुरीची दुमाला करून नागर व मान-पान होली पोली दो ठाई करून महजर करून दिल्हा आहे त्याप्रमाणे त्यास व याचे पुत्रपौत्रीदि वस परेपरेस सुरलित चालवीत जाणे गोदजी गरुडापासून शेर्णी राजश्री शकराजी पडित सचीव याही घेतली आहे त्या खेरीज हाली रुपये २५० येकून अडिचस याचा उसूल घेऊन हुजून पाठवणे या वतनास हकलाजिमा सालाबाद भोगवटा चालिला असल त्यापैकीं निमे गरुडास चालवीत जाणे सालदरसाल ताजा सनदेचा उजूर न करणें या पत्राची प्रती लेहून घेऊन असल परतुन गोदजी गरडापासी देणे जाणिजे छ २१ रमजान

---

ले. ३६ } श्री { श. १६२७ आषाढ वद्य १२
इ. १७०५ जुलै ६ }

* छ. मा देसमुख व देसपांडे कसबा **सासवड** प्राा पुणे यासी **बालाजी**

( बाळाजी विश्वनाथांचा गोल शिक्का ले. ३९ पहा ) **विश्वनाथ** सुहूर सन सीत मया अलफ मौजे **बेलसरीचे** पाटि(ल)कीचा व्यावहार **गरुडा**मधे व **मालिया**मधे लागला होता त्यासी हुजूर पावेतो कथला होऊनु निमे गरुड व निमे माली याने करावी यैसा तह हुजरून जाहाले असे. + प्रमाणे निवाडेची राजपत्रेही आहेत. तरी तुम्ही दोघाचे हक्क हिसेवी निवाडा करून बराबरी हक्क असेल ते वाटून देणे येविशी बोभाट येऊ न देणे जाणीजे छ २५ रबिलोवल मोर्तब

सुद

---

**ले. ३७** } श्री { श. १६२८ मार्ग. शु. ४ / सन १७०६ नोव्हेंबर २९

छ मशुरुल आनाम देशमुख व देसपांडे ता सासवड यासी **जयेसिग जाधव-राऊ सेनापति** सुहूर सन सबा मया अलफ **गरुड व जगथाप याचा** मोकदमीचा गर्गशा मौजे **बेलसर** ता मजकूर येथील होता त्यास गोतमुखे निवाडा होऊन मोकदमीचा महजर जाला होता वाडा व सेते आभोगत राहिली होती त्याच्या ही निवाडा होऊन महजर आलाहिदा सादर आहेत त्याप्रमाणे हरदुजणास वर्तवणे जाणिजे* *रा छ ४ रमजान* मोर्तब सुद बिलसाति

( श्री ० राजा राम चरणी दृढ भाव सेनापति धनाजी जाधव राव (ले. ३८ प्रा) )

( तीन ओळींची लेखना वधि मुद्रा आठ कोनी मुद्रा )

---

**ले. ३८** } श्री { शक १६२८ मार्ग शुा ५ / इ. १७०६ नोवें. २९

छ मशुरुल आनाम देसमुख व देसपांडे ता **सासवड** यासी **जयसिग जाधव-राऊ** सेनापति सुहूर सन सबा मया आलफ गरुड व जगथाप या हरदु जणाचा मोक-दमीचा गर्गशा मौजे बेलसरचा होता त्यास हरदुजण गोतात

---

* अक्षर निरनिराळें.

| | |
|---|---|
| ॥ श्री ०<br>राजाराम<br>चरणी दृढभा<br>व सेनापतिध<br>नाजी जाध<br>व राव<br>( अष्टकोनी सहा ओळींची<br>दुवलयी मुद्रा ) | जाऊन गोतमुखे निवाडा होऊन गोतानें महजर करून दिल्हा आहे मानपान व मोकदमचिया तकसीमा वाटून अलहिदा महजर सादर आहे त्या प्रमाणे **गरुड व जगथाप** हरदु जणानी वर्तावे ऐसी आज्ञा केली आहे तरी तुम्ही हरदुजणास सांगोन महजर प्रमाणे प्रमाणे वर्तवणे जाणिजे *छ ४ रमजान मोर्तबसुद<br>बिलसतु<br>लेखनाव ( ले. ३७ प्रो )<br>धि मुद्रा |

---

ले. ३९ } श्रीशकर { श. १६२९ श्रावण वद्य १०
{ इ. १७०७ आगष्ट ११

| | |
|---|---|
| लक्ष्मीकांत<br>पदांभोज भजनाप्त<br>समुन्नतेः ॥ बाळाजी<br>विस्वनाथस्य मुद्रा<br>विजयते तरा | ( मुद्रेंत श्री नसावी<br>ओळी पांच<br>आहेत. आकार<br>वाटोळा दुवलय<br>अक्षर बारीक ) |

आज सरसुभा राजश्री **बालाजी विस्वनाथ सर सुभेदार** मा। हाय **राणोजी पाटील सोनजी पाटील जगथाप**+ जगथाप मौजे **बेलसर** ता। कर्‍हेपठार सुहुर सन समान मया अलफ तुवा आपली बाकी **गोदजी गरुड** मोकदम याजपासून घेतली म्हणउनु हुजूर विदित जाले याउपरी देखत कागद रुाये ३७५ पावणे चारसे **गोदजी गरुड** याचे यास देणे फिरोन बोभाट हुजूर येऊ न देणे या छ २३ जमादिलोवल हकहिसाबी जे होईल तेणेप्रा यांस देणे मोर्तब ( वर्तुली
सुद मुद्रा )

---

* येथून अक्षर निराळें

+हे तीन शब्द मधेंच ओळीवर लिहिले आहेत.

ले. ४० } श्री {*श. १६२९ पौष शु. ७
इ. १७०७ डिसेंबर २०

श्री
वर्धिष्णुर्विक्रमो
विष्णोः सामूर्तिरिव
वामनी शंभुसूनो
रसौ मुद्रा शिवरा
जस्य राजते

( सहा ओळींची अष्टकोनी दुवलयी मुद्रा )

स्वास्ति श्री राज्याभिशके शके ३४ सर्वजित नाम छवछरे पोश सुध सतमी मंदवासरे क्षेत्रिया कुलावतंस **श्रीराजाशाहू छेत्रपंती** स्वामी याणी **गोदजी गरुड** बिन **खडोजी गरुड** निमे पाटील मौजे **वेलसर** कर्यात सासवड प्रा **पुने** यांसि दिल्हे वृतीपंत्र ऐसे जे तुम्ही हुजूर येउनु विनती केली जे पूर्वी **निजामशाहचे** वेळेस मुलुक वैरान होता ते वख्ती **मलिकानी** व **शाइभाई खोजे** यानी आपले वडील बोलाऊन नेऊन मौजे मजकूरची पाटिलकी वतन करून कौर्द करविली सींव पेडोवळे घालून दिल्हे

+ ~ श्री ० +
शिवनरपाति ह
र्षनीधान मोरेश्वर
सुत भैरव मुख्य
+ प्रधान +
( वाटोळी पांच ओळींची दुवलयी मुद्रा )

ते वेळेस आपले वडील **विठोजी** व **माहदजी गरुड** गावींची वसाहत्त करून पाटिलकी आनभवीत्त असत्तां त्तीन पिढ्या उपभोग जाला त्यावरी **माहदजी गरुड** मोकदमी करितां वृंध जाला कसाला होइना म्हणोन **माउजी माली जगथापं** व **काउजी माली जगथापं** हे दोघे भाऊ होते ते अणून मुत्तालीकीस ठेविले पाटिलकीची मुतालिकी चाळवीत होते त्यावरी **बावजी गरुड** याचा लेक **मलिकवंरा**जवळ चाकरीस [ अस ]त्तां भाडणी पडिला त्ते समई माळ्यानी दुखवटि-यार्चे जेवण करून साऱ्या **गरुडाचा काबिला** घरास नेला अनी दगा करून चेत्तालीस माणेसे मारली अनी माली पंळोन गेले गाव वोस जाला त्यावरी देसमूख व देसकुलकर्णी यानी कौल देऊन आणिलें त्यावरी सभाजी गरुड विज्यापुरी होता तो गावास आलिया-वरी त्याणी माळ्यास पुसिले की तुम्ही आपले मुत्तालीक गावात असतां आपले खुण

---

* **टीप**- रा. भि. ३० सुभानु अश्विन बहुल सप्तमी या दिवशीचें श्री राजा शिवछत्रपति यांनीं देशमुख-देशपांडे का सासवड यांस दिलेलें तालिक आज्ञापत्र गरुड-संग्रहांत आहे. शेवटीं गरुडाकडून शेरणी एक हजार रुपये व माळ्याकडून पांचशें रुपये गुन्हेगारी करार केली आहे. अधिक मजकूर विशेष कांहीं नसल्यानें नकल येथें दिली नाहीं. ले. ४० च्या लेखांत कांहीं ठिकाणीं ल करितां ळ, त च्या जागीं त्त, ळच्या जागीं न आला आहे.

बेतालीस कार्ये म्हणोन जाले त्यास माळ्यांनी जाब दिल्हे कीं आपण पाटिलीकीचे खावंद आहे मुतालिक नहो त्या दीवसापासून जोरावारीनें कथला करावयास लागले **मिरांखान पुणियात** हकीम होता त्याजवल भाडत जाऊन हकीकत सागितीली त्यानी माळ्यास तळब करून नेऊन हकीकत विचारली ते समई **सभाजी गरुड** यास सागितिले की तु दिव्यं करणे त्यानी मान्ये केले त्तेव्ह मौजे मजकूरच्या पाढरी व श्री सिधेस्वरा सनिध दिव्यं केलें अणी हती पिंसव्या घालून जेजुरीस श्रीच्या दर्शण घेऊन जात असता खल्दच्या रानीं चिचाल्या नजिक माळ्यानी दबा धरून **सभाजी गरुड** जिवे मारिला त्या उपरी कितेका दिवसा **खंडोजी व काउजी गरुड विज्यापुरास** जाऊन **यांकुदखानाजवल** उभे राहिले त्तेथे माली गैरहाजीर जाला तेव्हां **बाजी नाईक** देशमूख व **रामाजी त्रिमल देशकुलकर्णी** कसबे मजकूर यानी हतीं धरून माहली आनिले की तुमची विल्हे अम्ही माहली करून देतो परतु विल्हे होऊन आली नाही त्याउपरी **गाधाडी सिकरापूर** येथे हि उभे राहिलो तेथें माली गैरहाजीर जाला त्यावरी थोरले कैलासवासी स्वामींच्या कारकीर्दीस **बाजी घोळपं मुद्राधारी किळे पुरंधर** व **त्रिबक, गोपाल** देशाधिकारी प्रांत मजकूर याजवल जाऊन वर्तमाण सागितिळे परतु निवाडा होऊन आला नाहीं त्यावरी **औरंगजेब** पातशाह **तुलापुरी** होते तेव्हां जाऊन उभे राहिलो तेथेहि माली गैरहाजीर जाले त्यावरी कैलासवासी स्वामींच्या वेळेस **सताजी घोरपडे** यानीं हर दो जणास आणून जमान घेऊन गोत दिल्हे परतु माली गोतात हाजीर जाला नाही त्या उपरी मौजे **भाटघर** ता **येल्हवडी खोरे** त्तेथे राजश्री **शकराजी पंडित सचीव व रा जाधवराऊ सेनापती** वरकडी लस्करचे सरदार राहिळे होते त्याजवल जाऊन उभे राहिलो ते समई त्यानी माल्यास आणून समस्तं गोत मेळऊन हर दो जणाच्या तकरीरा ळेहून घेऊन गोतमुखे निवाडा जाला की निमे पाटिलकी अपनास चाळवावी व निमे पाटिलकी माळ्याणे चाळवावी यसें करून गोहीसाक्षींनसी महजर करू दिल्हे ताम्राकडे हि **खानचंद** किलेदार **पुरंधर** याजकडे हि जाऊन वर्तमाण सागितिळे त्याने गोतमुखें निवाडा करून सदरहू प्रा महजर करून दिल्ह यैसें आसता **तान्हाजी जगथापं** कथला करून सुरलीत वंर्तंतं नाही तरी स्वामीनी मनास अणून पारपंत्य करावया अज्ञा केली पाहिजे म्हणोउन विनतीं केळी त्यावरून स्वामींनी मनास आणितां पूर्वीहि निवाडा जाला आहे व हाली करिना मनास अणीता निमे पाटिलकी तुमची खरी यैसे जाणोन हे पत्र तुम्हास करून दिल्हे असे तरी तुम्ही मौजे मजकूरची निमे पाटिलकी करून हकलाजिमा पूर्वापार चालिला आहे तेणेप्रमाणे **तान्हाजी माली** निमे पाटील व तुम्ही यैसे हर दो जण घेत जाणे होळीस पोळी लावणे ते दोघे समागमे लावणे +जाणिजे मर्या

[ षट्कोनी—माथ्याच्या व तळच्या रेघा सरळ व देयंरा

बाकीच्या चार नागमोडीच्या तीन ओळींची मुद्रा ] जते

+ तेरीख ६
+ माहे सवाल सुा समान

+ + +
बार सुरु सुद बार

---

ले. ४१ } श्री { श. १६२९ माघ शु. १२
इ. १७०८ जाने. २४

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ३४ सर्वजित सवत्सरे माघ शध द्वादसी भृगवासर क्षत्रीय कुलावतंत श्री राजा **शाहु छत्रपति** स्वामि याणी **तुलाजी पवार** यास आज्ञा केली ऐसी जे तु मोगलाई तर्फेन सुधां राहोन मौजे **वेलसर** तर्फ **कऱ्हेपठार** यास उपसर्ग करीतासि म्हणून हुजुर विदित जाहाले तर ऐसे ढंग करावयास दरकार काये फौजदारी म्हणून धामधूम करावी हे स्वामीस मानत नाही याउपर मौजे मजकुरास कोणयेकविशी तसवसि तगादा न करणे परतोन बोभाट आलिया उबार राहाणार नाही जाणिजे मर्या

‿ श्री ०
+ ++
शिव नरपति ह
र्ष नीधान मोरेश्वर
सुत भैरव मुख्य
प्रधान
(लंबगोल पांच ओळींचा
तिवलयी शिक्का )

देंयरा (पट्टकोनी)
जते

*सुरुसुद

---

ले. ४२ } श्री { श. १६३२ आश्विन वद्य ६
इ. १७१० आक्टोबर ३

० श्री ०
पार्वतीकांत भक्त
स्य विश्वनाथात्मज
न्मनः ॥ जनार्दनस्य
मुद्रेयं भातिलोक
यशस्विनी

( लंब वर्तुळ
ओळी ६ वलयें २ )

आज्ञापत्र राजश्री **बालाजी विस्वनाथ** ताहा **गोदजी गरुड** पाटील मौजे

---

+ अक्षरें ६ वेगवेगळीं. कागदास जोडावर चार ठिकाणीं ही मुद्रा उठविली आहे. पण तिचा आकार लंबवर्तुळी आहे. म्हणजे प्रधानांच्या मुद्रेसारखा. * कागदाचे मागें.

* अक्षर वेगळें.

लेखन
सीमा समु
ल्ल सति

**वेलसर** का सासवड सुहूर सन इहिदे अशर [१]आलफ तुम्हास मौजे मजकूरचे पाटिल-कीचे कथलियाबदल राजश्री **पंतसाचिव** याणी नेले होते त्यास तुम्हापासून राजश्री **त्र्यंबक सिवदेऊ** याणी रुपये ४०० च्यारसे वतन संमधे घेतले ते मजुरा असेत छ२०
साबान मोर्तब ( लंब वर्तुळ दुओळी दुवलयी )
सुद

---

ले. ४३ } श्री

राजश्री **गोदजी गरुड** व [२]राजश्री **लखमोजी गरुड** व **मलहारजी गरुड** गोसावी

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——— स्नो[१] **बालाजी विश्वनाथ प्रधान** आसीर्वाद येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणे विशेष तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला लिहिलें कीं आपणास राजश्री स्वामीचे पत्र व आपले पत्र अैसी पाठवीजे म्हणजे भेटीस येतो म्हणोन लिहिले येसीयासी तुमचे चालवावे हे आम्हास बहुत अगत्य आहे तरी कोणेविसी अनमान न करिता स्वार होऊन येणे तुमचे मनोद्यानरुप चालवावयासी अंतर होणार नाही याविसी राजश्री **खंडेराऊ** याही तुम्हास लिहिले असे तरी दुसरा विचार न करितां भेटीस येणे राजश्री स्वामीचे पत्रही पहिले पाठावले आहे मौजे **बेलसरचे** विसी लिहिले तरी तुम्ही आलियावरी त्याचाहि निकाल तुमच्या विचारेकरून तुमचे चितानरुप करून देऊन अंतर न पडे तरी कोणेविसी अनमान न करीता पत्र पावताच स्वार होऊन भेटीस येणे जाणिजे छ २६ जिल्काद
* बहुत काय लिहिणें लेखन ( वर्तुळी दुवलयी व दुओळी मुद्रा )
सीमा

श्री
राजा शाहू न
रपती हर्ष निधा
न बाळाजी वीश्व
नाथ मुख्य प्र
धान

( पत्राच्या मागें शेवटच्या ओळीस चिकटून ही मुद्रा आहे. वर्तुळी सहा ओळींची दुवलयी मुद्रा )
( मागें ) सुरुसुद
जोडावर लेखनसिमेचा शिक्का दोनदां उठविला आहे.

---

१ 'मया' शब्द लिहिणें राहिला आहे.
* येथून अक्षर निराळें
२ येथें मुळांत मोडी रा काढून पुढें वेलांटीयुक्त काना पडला आहे. स्नेहांकित ऐवजी स्न काढून वेलांटीसह काना काढला आहे.

ले. ४४ } श्री { श. १६३७ आश्विन शुा ७
इ. १७१५ सप्टें. २५

* राजश्री ( **गोदजी** गरुड ) व राजश्री **लखमोजी गरुड** गोसावी यांसी

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——श्री **बालाजी विस्वनाथ** प्रधान आसीर्वाद् सुा सीत अशर मया अलफ बहुत दिवस तुम्हाकडील पत्र येत नाही वर्तमान कलत नाही तर सविस्तर लिहिणे वरकड कितेक अर्थ राजश्री **खंडेराव दाभाडे** यांही लिहिला असे तरी तुम्ही कोणेविसी मनात दुसरा विचार न आणिता भेटीस येणे तुमचे मनोद्यानरूप चालवावयासी अंतर होणार नाही जाणिजे छ ७ शौवाल † बहुत काय लिहिणे लेखन
सीमा

श्री
राजा शाहु न
रपति हर्ष निधा
न बालाजी वीश्व
नाथ मुख्य प्र
धान

( हीहि मुद्रा ले. ४३ प्रमाणें असून ती पत्राच्या पाठीवर प्रारंभींच आहे. )

---

ले. ४५ } श्री { श. १६३९ ज्येष्ठ वद्य १३
इ. १७१७ जून २५

( ले. ४३, ४४ प्रमाणें पण पत्राच्या माथ्यावर बा. वि. ची मुद्रा आहे. )

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री **बालाजी पंडित प्रधान** ताहा **गोदजी बिन खडोजी गरुड** पाटील मोकदम मौजे **बेलसर** कर्यात सासवड सुहूर सन समान अशर मया अलफ **तानाजी जगथाप माली** निमे मोकदम यांचा व तुमचा मोकदमीचा कथला होता त्यास दिवाणची पत्रें व गोताचे महजर तुम्हापासी आहेत त्यास मध्ये तुम्ही परागदा जालेस याकरितां हरदूजणाचे वतन दिवाण अमानत केले होते त्यास साल मजकुरी **सासवडचे** मुकामी तुम्हास व तानाजी जगथाप यास आणून गावीचे लावणीत संचणीची आज्ञा केली त्यास तानाजी जगथाप माली मोकदम मौजे मजकूर याणे विनंती केली आम्हा उभयेताचा कथला लागला यामुले वतन दिवाणात अमानत जाले गावीची कीर्दी होत नाही याउपरी

---

* येथून अक्षर निराळें.

† ले. ४३ व ले. ४४ मधील 'बहुत काय लिहिणे–' चें अक्षर एकाचेंच आहे.

आपण निमे मोकदमीचा खावंद तसेच **गोदजी गरुड** निमे मोकदम हे खरे आम्ही उभयेता भाऊ समजलो याउपरी वतन अमानत केले आहे ते उभयेताचे दुमाला करून आज्ञा दिलिया गावीची वसाहत करून याउपरी कथला करणार नाही म्हणून राजिनामा लेहून दिल्हा त्यास राजीनामा हाजीर मजालस

कसबे सासवड
२ देसमूख
१ नारायणाजी नाईक
१ सुलतानजी नाईक
२
१ राहूजी बिन मालजी पाटील मोकदम
३
कमलोजी चोर मोकदम मौजे भोईर १
कानोजी जवलकर पाटील मौजे खानापूर १

लखाजी धायेगुडे सर्ज्याराऊ मोकदम मौजे मोरवे १
काऊजी इगले मौजे वालूज १
बहिरजी झांबरे पाटील कसबे पुणे १
विकलम देवराऊ नारायण बेलसरे जोसी कुलकर्णी मौजे मार १

येणेप्रमाणे हाजीर मजालस मेलऊन राजीनामा **तानाजी बिन माऊजी जगथाप** मोकदम मौजे मार याणे लेहून दिल्हे ऐसे जे **गोदजी बिन खंडोजी** गरुड यांमध्ये व आपणामध्ये मोकदमीचा कथला होता त्यास आपण उभयेता पूर्वी जो निवाडा जाला आहे मराठे राज्यातील व मोगलाईची पत्रे व गोताचे निवाडपत्रें आहेत त्याप्रा समजलो ऐसा राजीनामा लेहून दिल्हा त्यावरून मनास आणिता तुमचे निमे वतन खरे काही दिवस कथला लागला होता परंतु दिवाणची पत्रे व गोताचा महजर आहे आणि हाली उभयेता समजलेस हे जाणोन पानमान वस्त्रे देऊन मोकदमीचे वतन निमेप्रमाणे उभयेताचे दुमाला केले आसे तरी निमे वतन मोकदमी तुम्ही चालऊन हकलाजिमा पूर्वी महजर जाले आहेत तेणेप्रमाणे घेऊन सुखरूप राहाणे तुम्हाकडे निमेवतनाची हरकी रुपये ५०० पाचसे करार केले असेत वसूल देणे आणि सदरहू वतन आनभऊन सुखरूप राहाणे छ २६ रजब +पाा हुजूर लेखन

सीमा

---

+ अक्षर भिन्न.

जोडागिरीवर लेखन सीमेचाच शिक्का दोनदां उठविला आहे.

ले. ४६ } श्री { श. १६३९ आषाढ शुा ४
इ. १७१७ जुलै १

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री **हरि यादव** सर सुभेदार व कारकून प्रांत पुणे गोसावी यांस

सेवक **बालाजी विस्वनाथ** प्रधान नमस्कार सुाा समान अशर मया अलफ राा **लखमोजी बिन गोंद्जी गरुड** याजवरी राजश्री——स्वामी रुपाळु होऊन खालीसा पड जमीन अवलदूमसीम तीन प्रतीची ची[1] जमीन चावर दोनी

मौजे बेलसर काा सासवड चावर १ मौजे धालेवाडी ताा करेपठार प्राा मार चावर ·।।·
मौजे नाझरे ताा करेपठार चावर ·।।·

येकूण दोनी चावर पड जमीन इनाम पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने दिल्ही आहे हुजरातची सनद अलाहिदा सादर आहे तरी तुम्ही मारनिलेस सदरहू गावी दोनी चावर जमीन नेमून देऊन इनाम चालवणे जाणिजे छ २ साबान सदरहू गावीचें थलास कुणबी हाजीर नसेल गतकुल सेत असेल ते नेमून देणे +पाा हुजूर लेखन

सीमा

---

ले. ४७ } श्री { श. १६३१ कार्तिक वद्य १४
इ. १७०९ नवंबर १९ शनिवार

छ, माा अनाम देशमूख व देशपाडे पाा **पुणे** यांसि **बालाजी विश्वनाथ** प्रधान

~ श्री ०
राजा शाहू न
रपती हर्ष नीधा
न बालाजी वीश्व
नाथा मुख्य प्र
धान
(ले. ४३, ४४ प्रमाणें मुद्रा)

सुहूर सन आशर मया व अलफ आम्ही येकादसीस पुरंधरास आलों यैसियास काा **पुणाचे** सेटे माहाजन हुजूर बोलाविले आहेत तरी तुम्ही व मोकदम सेटे माहाजन व माली मेहतरी घेऊन हुजूर येणे उजूर न करणे जाणिजे छ २७ रमजान या कामास रामजी कदम यास पाठविले यास राा ५ पाच देणे+ आज्ञा प्रमाण लेखन

सिमा

---

१ दुबार पडलें आहे. + अक्षर वेगळें.

* पत्रांत दिलेल्या सन १७०९ ला बालाजी विश्वनाथ मुख्य प्रधान असल्याचा पुरावा अद्याप नाहीं. अशरपूर्वी सालाचा निदर्शक एकं संख्येचा शब्द गळला असावा.

ले. ४८ } श्री { श. १६४० पौष शु. ३
इ. १७१८ डिसेंबर १२

⌣ श्री ०
राजाशाहु न
र पती हर्षनिधा
न बाळाजी वीश्व
नान मुख्य
प्रधान

( त्रिवलयी, सहा ओळींची राजातील 'रा' मोडी असलेली मुद्रा प्रारंभींच ले. ४३, ४४, ४७ प्रो )

आज्ञापत्र राजश्री ——पंतप्रधान ताहा **गोदजी पाटील गरुड** निमे मोकद्म मौजे **बेलसर** कर्यात सासवड सुा तिसा अशर मया अलफ तुम्हाकडे सालगुदस्ता सेरणी बाा रुपये ५०० पाचसे येणे होते तो यैवज वसूल स्वारी मजकूर गाा **भवान** + + + ( ग )रुड राा ये ५०० पाचसे जमा जाले मजुरा असे छ ३० मोहरम +आज्ञा प्रमाण लेखन
सीमा

( पाठीमागे ) +बार +सुरु सुद +बार

---

# संकीर्ण

ले. ४९ } ॥ श्री ॥* { श. १६५३ वैशाख वद्य १०
इ. १७३१ मे १९ बुधवार

॥[1]माहाराज ॥ श्री देव स्वामींचे सेवेसी ॥ **गोविंद पाठक गोदेकर** धर्माधिकारि [2] लेहावयाकारणें ऐसे जे **आदल महीमनखान** किलेदार किले **वादुर[3]कंगंड[4]** याचा मुकद्दमा बाबद जामीनी **तीमाजी घोलप** मउजे **अनगरे** रुपये ७२०० अपनाकडे होता त्यापइकिं अमचे[4] जे यजमान राजेश्री **शामजी दत्तो मुगि** यांसी खान मशारुले

---

+ अक्षर गवेगळें.

* ओळींतील प्रत्येक अक्षर वेगळे. सर्व पत्र बालबोधींत आहे. गोही व देशपांडे-सही मोडींत.

१ पहिल्या दोन ओळीपूर्वींच दोन दोन उभ्या रेघा काढल्या आहेत.

२ लेव्हावया असेंहि वाचतां येईल.

३ वर टिंबे दर्शवून अक्षर रद्द केलें आहे.

४ वरील मात्राहि आडवी रेघ मारून रद्द केली आहे.

यांनी रुपये सवा तीशाचि ३२५ वरात दीधली होती त्यापइकि रुपये १०० अपले मारफात वसुल जाले बाकि रुपये २२५ राहीले त्यासी स्वामीकडे **सयद सुलतान शाहाखान** मजकुराचे भाऊ आले त्यानी अला कजीयां झाडेयासी वारुण घेतल स्वामी-कडे **शामजीपंताचे** लीगाड रा राहिले नाही सुलनशाहाकडे लीगाडे लागेते व शामजी-पंत समजुन घेतील स्वामींचेसी सबध नाही सके १६२५३ विरोधिकृत संवत्सरे वैशाख कृ (पत्राचे पाठीवर) ष्ण दशमी बुधवार हे लेहीले सही वली सुमामार २६ बिकलं ॐ

गाही (मोडी)

बापूजी रंगनाथ देशपांडे

पा कडेवलीत सा अहमदनगर

---

**ले. ५०** सबनीस–मलकापूर | श्री | श. १५७९ भाद्र. वद्य ९ इ. १६५७ सप्टें २१

श्री कानोजि राजे प्रभानव लिकर वि[१] (गोल शिक्का ३ ओळींचा)

छ. कौलनामे अजरख्तखाने राजाधीराज राजेश्री **सुर्योजीराजे प्रभाणवलीकर** साहेब सुा सन समान खमसैन व अलफ ता माहाजनानी व रैयानी व विर्तिकानी मौजे चर × ली ता **हातखंबे** दिला कौलनामा ऐसा जें दरीवख्त हुजूर मालूम जालें जें **बादजी लोटणकरें** तुम्हास अजार व तशवीश दिल्ही व पेस्तर दटावणी करितो म्हणऊन तरी त्यासी हुजूर आणून **बाबाजीबी** ताकीद फर्मावितों व हालखुद ठेवितों तुम्ही फिकीर व अंदेशा न करितां खातिरजमा करून कीर्दी मशाखती व मामुरी करून मौजे मजकुरीं सुखें असिजे +मोर्त

ब (कुयरीच्या आकाराचा मोर्तब)

ते २२ माहे जिल्हेज

---

**ले. ५१** गोळे इनामदार–पुणें | श्री | श. १६४७ आषाढ वद्य १३ इ. १७२५ जुलै २६

राजश्री सुभेदार प्रांत **गुजराथ** गोसावी यासि

छ. अखडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—— सेवक **बाजीराऊ बलाळ प्रधान** नमस्कार सुहूर सन सीत आशरैन मया अलफ प्रात मजकूरच्या मामालेयाची मजमू

---

१ पत्रप्रारंभींच्या शिक्क्यांतील शेवटचें अक्षर लागलें नाहीं.

राजश्री **मोरो गोपाळ** हुजूर उमेदवार होते यांसी सागोन पाठविले आसेत तुम्ही व हे येका मते स्वामीकार्य करीत जाणे यास तैनात सालिना होनु पादशाही १५०० दीड हजार रास केले आसेत माहाल मजकूरच्या यैवजपैकी पावणे यास जमान मार **गंगाजी बावाजी** सुबेदार प्रा **कल्याण** घेतले असेत छ २६ जिलकाद लेखन सीमा

( कागदाचे मागे ) ᴗ श्री ०

राजाशाहूनरप
तिहर्ष निधान बा
जीराव बलाळ
मुख्यप्रधा
न (उलटा न)

---

ले. ५२ } श्री { श. १६६५ श्रावण वद्य ९ / इ १७४३ आगष्ट २

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ७० रुधिरोद्गारी नाम संवत्सरे श्रावण बहुल नवमी भो*भवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा **शंभु छत्रपती** स्वामी यांणी राजमान्य राजश्री **अंमृतराव शंकर** यांसि आज्ञा केली यैसीजे राजश्री **माहादजी भानगिरे** हवालदार दि॥ रत्नशाला याचे मिरासीचें सेत व घर ठिकाण मौजे **हडपसर** ता॥ हवेली पुणें या गांवी आहे त्यासीं तेथील पाटलानें कथला आरंभिला आहे व **महमदवाडी** हवेली मार येथें सेत व घर ठिकाण आहे त्यासी तेथील गांवकरी यानीं कज्या केला आहे म्हणून हुजूर विदित जाले तरी यांची सेतें व घर ठिकाणें पुरातन मिरासीचीं असतां व सर्वांस दखलहि आहेत यैसें असोन कज्या करितात म्हणजे काय मारनिले हुजूर स्वामीसंनिध आहेत यांचें स्वामसि अगत्य आहे हाली येविसी राजश्री **बालाजी पंडित प्रधान** यांस लिहिलें आहे तरी तुम्हीं यांचें साहित्य करून सदरहू दों जागां यांचीं सेतें व घर ठिकाणें मिरासीचीं आहेत तीं यांचीं यांकडे सुरालित चालेत कज्या करणार हालखुद राहून कज्या न करीत तें करणें येविसीं अगत्य धरून यांचे सेताचा व घर ठिकाणाचा कज्या तोडणें जाणिजे +बहुत काय लिहिणें मर्यादेयं

(कमळाकृति) विराजते

+सुरु सुद +बार +समत सुद+बार बार

---

\+ सहाहि अक्षरें भिन्नभिन्न

* जंत्रींत नवमीला बुधवार दिला आहे. मंगळवार धरून मिती तारीख दिली आहे.

ले. ९३ } खवलीकर जोशी } श्री { श. १६७२ श्रावण शु. १ { इ. १७५० जुलै २३

शेके १६७२ प्रमोदी नामसंवत्सरे श्रावण शुा १ ते दिवसी लिा **बाळाजी मोरेश्वर** यांसि **दमाजी गायकवाड** समसेर बाहादर लिा यैसें जे प्राा **आकलेश्वर** व प्राा **गलवे** येथील कमाविश तुम्हांस सांगितली होती गुा **भास्कर बलाल** त्याचे हिसेबीं व कर्जाचे हिसेबीं तुमचे फाजील सरकारात व्याज मुदल रु. २८४००१ दोन लक्ष चौन्हासी हजार रुपैया यास व्याज दरमाहे दर सदे रुा २ दुहोत्रा प्राा देऊन हे लिहिले +सही

० श्री ~ मार्तंड चरणी दृढभाव बाबुराव (अष्टकोनी मुद्रा) मोर्तब सुद

(कागदाचे पाठीवरील मजकूर) + हें मोडी अक्षर दमाजी गायकवाड यांचें

जमा २८४००१
 १०८५७२
 ३९२५७३

सदरहू हेखत
श्रावण शुा १

~—तीन लक्ष ब्याणव हजार पाचसे त्र्याहातर पैकी वसूल पावोन बाकी राहिला तो हिसेब मुा पुणे ३११५७२ पैकी श्रीमंत राजश्री पंत प्रधान याणी करार केले रुा २७५००० पावणे तीन लक्ष याचे हप्त सन सीत खमसैन पासून वरषे बारा ते कबूल असो पैकी वसूल

२४०६२॥ सनसीत खमसैन चोवीस हजार साडे बासट

२१६९३॥ सन समानचा हप्ता भरून पावलो

१२५४५ सन सबा २२५८१ पैकी मार्गसिरुप
१००३६ श्रावण अखेर सन सबापैकी
२२५८१

---

ले. ९४ } श्री { श. १६८९ भाद्र. शुा १२ { इ. १७६७ सप्टेंबर ५ शनिवार

श्रीविनायक

महाराजश्री ——देव ——स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक **लिंगपा जायगौंडा** देसाई व सरदेसाई व नाडगौडा मामले **तोरगल** व पा **कोकटनूर** कृतानेक प्रणाम विज्ञापना येथील क्षेम भाद्रपद शुध १२ पावेतो स्वामीचे कृपाकटाक्षें येथास्थीत असे विशेष बहुत दिवस स्वामीयांकडील वर्तमान न कलतां चित्त सापेक्ष होतें वो राजश्री **केशवभट बावा जोइसी मोरगांवकर** आले याणी क्षेम समाचार सांगितला कलोन संतोष पावलों सदैव आसीर्वाद पत्र

पाठऊन परामर्श करावया स्वामी **समर्थ** असा आम्हाकडील वर्तमान वो राजश्री मुक्काम निवेदन करितील त्यावरून सवर्सा अवगत होईल **नवलगुंदी** श्री——प्रतिष्ठापना करावायाचें आहे व दर वर्षास भाद्रपदमासी रथोत्सव होत आसतो यास प्रतिष्ठापन विधान व ध्वजारोहण आदिकरून रथोत्छवपर्यंत गणेशआगमविधिपूर्वक पोथी पाहिजे येथें तलाश केला परंतु कोठें आढलत नाही यास्तव विनंती लिहिली आहे पोथीचा तलाश करऊन पाठविलेया स्वामींचे रुपेकडून विधानपूर्वक येथासांग मोहत्छव होईल हाली वो यांसमागमे स्वामीकारणे धोत्रजोडा येक पाठविला आहे अंगिकारिला पाहिजे बहुत काय लिहिणे रुपा आसों यावी +आदौ अंकुरार्पण आदिकरून अवभृत स्नानपर्यंत येथासांग प्रयोगसहित रथोछवाची पत्धती लिहवाऊन अगत्य पाठवणेस अभिज्ञ असां हे विनंती

+पौ कार्तीक शुक्ल ९ शके
१६८९ सर्वजित संवत्सर ( १७६७ आक्टो. ३१ )

---

ले. ५१ } श्री { श. १७०७ भाद्र. शु. १२
{ इ. १७८५ सप्टं. १५

राजश्री **निलो गोपाल** गोसावी यासी

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——श्रा **तुकोजी होलकर** दंडवत सुा सीत समानीन मया व अलफ **परशराम** परदेसी चादवडकर याने विदित केले की मजकडे श्रींनी मौजे **वाणेर** ता हवेली प्रांत पुणे या गावची हावालदारीची चाकरी सागितली याजकरिता म्या आपले कुटुंब तेथे अणून दाहा पाच साले चाकरी केली दोन तीन साले बेरोजगारहि वस्तीस होतो त्यास माझे घरी माझे बायकोचे अंचरण गैरचाल मजला आडलले यास्तव रागाचे तवेशात तिजला एकदोन वार केले याजमुळे श्रीकडील कारभारी यानी माझे घरातील वस्तभाव व नगनगोटे वगैरे झाडून चिचवडा +स नेले आहे ते माझे मजला देविले पो म्हणोन त्यावरून हे पत्र तुम्हास सादर केले असे तरी पुरुषाने आपले बायकोस तवेशाने मारल्यामुळे याची वस्तमाव तुम्ही नेली बायको व मुले बाणेऱ्यात आहेत हा परभारा फिरतो परदसी याचे याजला प्राप्त होत नाही याचे कारण काय इतःपर पर परशराम परदसी याची चीजवस्त तुम्ही नेली असेल ते व याची बायको व मुले बाणेऱ्यात आहेत ते याची याचे हावाली

श्री
म्हाळसाकां
त चरणी तत्प
र मल्हारजि सु
त तुकोजी हो
ळकर
( पत्राचे पाठीवर प्रारंभीच तीन पदरी कोयरी आकाराची मुद्रा )

---

+ मोडी अक्षर वेगळें वेगळें.

करून देणे *फिरोन बोभाट येऊ न देणे *जाणिजे *छ १० जिलकाद बहुत काये लिहिणे मोर्तब (तीन पदरी कुयरीचा मोर्तब)

सुद

---

ले. ५६ बापूसाो गोळे इनाम ०पुणें } श्रीम्हालसाकांत { श. १७१५ आश्विन शु. १० इ. १७९३ आक्टो. १४ सोमवार

राजश्री कमाविसदार लेखक वर्तमान भावी प्राो **दसकुरइ** हवेली **अमदा(बा)द** गोसांवी यासि

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य ——— श्राो **गोविंदराव गायकवाड** शेनाखासखेल समशेर बाहादर दंडवत सुाा आर्बा तिसैन मयां व आलफ शके १७१५ प्रमादीनाम संवत्सरे अश्वीन शुाा विजयादशमी ते दिवसी राजश्री **विठलराव मोरेश्वर गोले** याणी पुण्याचे मुकामी साो कीं पेशजी **अमदाबादेच्या** मुकामी मौजे **इसलपूर** प्राो दसकूरई हवेली अमदाबाद हा गाव इनाम कुलबाब कुलकानु दरोबस्त करार करून देऊन गांवास पत्र करून दिल्हें होतें तें इनाम पत्र **इंग्रेजानी अमदाबाज** घेतली ते समई गेलें भोगवटा चालिला नाहीं त्यांचा जीर्णोद्धार नवीन पत्रें करून देऊन गांव आम्हाकडे चालवावा म्हणोन त्याजवरून मनास आणितां पेशजी गांवचे इनामपत्र करून दिल्हें होते तें गलांटले +गावचा भोगवटा चालिला नाही

(येथें पाहिल्याच ओळीशीं लागून डाव्या बाजूस अष्टकोनी मुद्रा) मशारनिले दौलतीचे कल्याण इच्छक पूर्वीपासून याचा घरोबा आमचे कल्याणार्थ पाहिलेपासून श्रमसायास केले आहेत जाणोन मौजे इसलपूर मजकूर हा गांव इनाम कुलबाब कुलकानु हालीपटी व पेसतरपटी खेरीज हकदार सालमजकुरापासून इनाम दिल्हा असे तरी मारानिले व पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने मौजे मजकूर हा गांव दरोबस्त हकदार व इनामदार खेरीज

छत्रपती आखिलप्रौ
ढ प्रताप पुरंदर गोविं
दरावगायकवाडसे
ना खासखेल सम
सेरबाहदर

करून इनाम चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास परतोन मारनिलें यांचे हवाली करणें जाणिजे छ+ ७ [1]रबिलौवल +मोर्तब सुद मोर्तब (अष्टकोनी)

सुद

---

*ही सर्व अक्षरें निराळीं + दोन्ही अक्षरें वेगवेगळीं

१ जंत्रींत रबिलौवल ८ आहे.

ले. ५७ जोगळेकर पुणेसंग्रह } श्री { श. १७१६ ज्येष्ठ शुा ५ इ. १७९४ जून २ सोमवा

श्रीमंताचे वाड्यांत कोठीस आग लागोन सात खणीचे तिसरें मजल्यास अग्न लागली तेव्हा नवस केले ते

२ श्रीखंडेराव जेजुरीचा यास
*रु १ हजार रुपये पुढे ठेवावयास पाठवावे
१ श्रीमंतानी दर्शनास जेव्हा अनकूल पडेल तेव्हा जावे
—
२

* श्रीमंतानी जाऊन दर्शन घेतलें हजार रुपये पुढें ठेविलें

२ श्रीमंताचा कुलस्वामी उतरेश्वर
१ महारुद्र अभिषेक
१ सहस्र ब्राह्मण भोजन तेथे घालावे
—
२

२ पुण्यातील गणपतीस
१ माहारुद्र अभिषेक
१ सहस्र ब्राह्मण भोजन
—
२

पुढें आग वाढू नये चौसोपीस लागू नये म्हणोन

* हें नाना फडणीस यांचें हस्ताक्षर.

ऐ. ले. सं. ९ ले. ३५७० चें पुण्याहून मिरजेस जें वार्तापत्र पाठविलेलें छापलें आहे त्यांत 'कोठीस दुसरे मजल्यास आग लागून ती (आग) सात खणी बंगल्यास झोंबली पांच मजले जळाले २ मजले मात्र मोठ्या प्रयत्नानें राहिले कोठी अगदी जळाली दप्तरें वगैरे कांहीं नाश झाला नाहीं' असें वृत्त दिलें आहे. ह्याच पत्रांत ह्या आगीचा दिवस व काल ज्येष्ठ शु. ५ सोमवार' तिसरे प्रहरीं असा सांगितला आहे. ह्या तिथिवारावरून खरे, शास्त्री यांनी ह्याचें वर्ष श. १७१६ इ. स. १७९४ हें दिलें आहे. जंत्रीत हें सर्व जमतें पण धडफळे यादींत (पृ. ३९१ श. १८३५ इ. वृत्त) 'कलसी बंगला सात मजली होता त्यास आग लागून जळाला व कोठी जळाली' असें ह्या आगीचें वृत्त श. १७१३ मध्यें दिलें आहे. मोडक जंत्रींत ज्येष्ठ शुा ५ सोमवार श. १७१६ मध्यें आहे व श. १७१३ च्या ज्येष्ठ शुद्धांत तृतीयेची वृद्धि दिलेली असल्यामुळे चतुर्थी सोमवारीं दिली तरी 'तिसरे प्रहरी पंचमी लागणें शक्य आहे. म्हणजे श. १७१३ व श. १७१६ ह्या दोन्ही वर्षी ज्येष्ठ शुा ५ स आगीचे वेळीं सोमवार येतो. मग वर्ष कोणचें ? ध. या. सामान्यतः शकानुक्रमानें 'स्मरणें' दिलीं आहेत. पण येथें श. १७१६ नंतर १७१३, १७१०,-१४,-२१ असे मागेंपुढें शकोल्लेख दिले आहेत. विशेष कीं श. १७१३ तील व ज्येष्ठ शुा ५ चाच एक उल्लेख पुढें त्याच पानावर आला आहे. म्हणजे वर श. १७१६ नंतर १७१६ तील सहाचे जागीं तीन चुकून पडले की काय ? असो. ऐ. ले. सं. त घेतलेल्या पत्रांच्या मूळ दफ्तराची व्यवस्था लक्ष्यांत घेतां ह्या पत्राचा काल श. १७१६ तील यावासा वाटतो.

—

ले. ५८ } श्री {

पुा राजश्री **गोविंदराव** स्वामींचे सेवेसी

विनंती उपर तुम्ही छ ९ जाखरची पत्रें पाठविली त्यांत

पंतप्रधान याशी घरोबा आहे हे त्याप्रों आहे परंतु **टिपू** अगर **इंग्रेज** दोघातुन येक पकेपणे हातात असावा की सर्वांवर दाब दोघाकडे राजकारणे लाविली त्यांत **इंग्रेजानी** मसलत उभी केली तेव्हा **टिपूकडील** तोडलें श्रीमंताचे निघण्यास तहनाम्याची उमेद होती त्यांतील कलमें उचारात आणिली असता **बादामीचा** समय मनात आणून आम्ही अर्ज मारुज करीतच गेलो लेकीन पिनिरा न जाले असा फिकरा आला यावरून य (की) न जाले की तहनाम्याची उमेद नाही ही गुंज चितात आसे हें मनानें घेतले टिपूशीं तों ज्यानी दुष्मनी पडली तेव्हा राहातां इंग्रेज राहिले यास बलकट धरावे यात होणे ते होऊ याची चाल आहेच अधिक होत आहे येविशीं विस्तरें लिहिलेत कलले त्यास तुम्हास घरोब्यानें लिहितों की तुम्ही जाते समई व मागाहून पत्रें हि पाठविली त्यांत लिहिलें की **बादामीचा** गुबार न्वाबाचे चितातील काढून स्वछता करावी से न जाहाले त्यावर किनवी नवाबाजवल त्यापेक्षा तुमचा सिलसिला नवाबाचे घरी बहुता दिवसापासून असे असता येकबयेक नवाब किनवीचे बोलण्यावर बाहेर निघाले असों आलीकडे नवाबाचे पत्र आलें त्याचा जाब लिहिला त्यांत जनाब अलीत इकडील अर्जमारुज इफ्तदाय इतकाच दोष येता तो थोडा बरें असों या फिकऱ्यांत काही **बादामीचे** नाव नाही मोघ(म) इफ्तदायपासून असें आहे तेव्हा बोलावयाचें होते की **त्रिंबकराव** मामा **रघुनाथरायाकडे** पाडाव गेल्यावर अर्ज करताच आपण आपण **कूच** केले याचा बयान काय करावा असाहि अर्थ बोलते तर होता म्हणजे **बादामी** मनांतून जाऊन संतोष वाटता दुसरें **बादामीचा** फिकरा मनात असता तर **आदवानीचे** उपराल्यास फौज सरकारची कां जाती व टिपूचे तहत आदवानी सोडण्याविशी किती घोल पडला हे तुम्हास माहीतच होते हे प्रकार बोलावयाचे होते तुम्ही मातबर येथील विश्वासू **नवाबाचे** दरबारास माहीत तेव्हा आमची खातरजमा की **गाविंदरावे** तेथे आहेत त्या पक्षी कोणेही गोष्टीची दिकत नाही परंतु लिहिली येतात यावरून पाहाता राजकारण जतन पाहिजे तसे राहिले नाही मध्यस्थाचे निखालसतेचे लिहिलें त्यांत **शिद्याचे** वगैरे कलमें लिहिली आली परंतु आम्हास समजलें की हे ठीक नाही हे ध्यानांत आणून मोघम कलम ठराऊन पाठविले ते वेलेस अशी जलदी दाखविलीत की उतर लौकर यावें म्हणजे जाहालेंच उतर न आले तर दुसरेंकडून राजकारण करावयाचे म्हणोंन आलें हा

पासून कोणेवरर्ती कसी पिजराव मंजूर जाली ते खातर मुबारकेंत असेल बयान करावयाची हालत नाहीं हा फिकरा वाचताच नवाबास लागला याचा तपसील यांतील अर्थ गहन शेवटी **बादामीचे** प्रकर्ण घेऊन बोलले त्यास या फिकऱ्यानें इतके वाईट वाटावयाजोगे होते तर तुम्हाकडे नकल पाठविलीच होती पत्र यावयाचेच नवते इकडे लिहून पाठवावयाचें होतें गोड करून लिहिलें असतें तुम्ही माहीत या फिकऱ्यावरून तहनाम्याची उमेद नाही तेव्हां तुटक असा अर्थ आणि या नाउमेदीमुले इग्रेजास बलकट धरावे ह्या गोष्टी लाहान नव्हत हे मनात न आले जाबास उसीर लागला शंका लिहिल्या असो उतर पाठविले त्या प्रा पुढें अमलांत तरी आलें मध्यस्ताने ठाव मात्र पाहिला शेवटी **सिंद्या**कडेहि कळविले नासून घाण केली तसेच **भोसल्या-**विशींचें जाबसालाचे पूर्वी काय लिहीत गेलेत हाली असी पत्रें पाठवावी म्हणोन लिहिता अशा गोष्टी पडतात या करतां पुर्ते अंदेशेचाली मनांत आणून करीत जावे तसेच हुजूरचें हुकमासिवाय पाणी पीत नाहीत **मालिटा**सी जाब देण्यास हुजूरचे निमित्य असें कुन्हे नवाबाचे चितात आणावयाचें माध्यस्थ बोलतात हे चांगलें की काय याचा विचार तुम्ही काहीच करीत नाही

---

ले. ५९
गोंधलेकर-पुणें

श्री

राजश्री नवाब **मीरखा** अमीर दौले महफूज बांषद

छ. *आज **यशवंतराव होलकर** दुवां विनंती उपरी तुम्हीं हुजुरिहून आज्ञा मागून गेला ते समई बोलण्यात आले की सरकार अमलासी न बोलता परभारे गुजरणी करू त्यास येथून जाताच बाडी वगैर राजश्री नवाब **नजीमखा इतमानुदौले** याजकडे सागितले तेथे जाऊन ठाणीं खाली करून द्यावी म्हणोन बोलला व माहालाची खराबी करिता म्हणोन हुजूर विदित जाले यैसियासी भाई घरचे घरींच अैसी चाल कल्याने कसे पडेल याचा विच्यार आपले ठिकाणी करून तिकडे **नजीमखाना**कडील ठाणी आहेत त्यासी काडीमात्र उपसर्ग न लागता बचाव करावा यास्तव हे पत्र लेखन केले असे तरी नवाबाकडील माहाल वगैरे याजला काडीमात्र ( पत्राचे पाठीवरील मजकूर, पहिल्या ओळीच्या प्रारंभींच अर्थात् डाव्या बाजूस मुद्रा उठविली आहे ती )

---

* आज = अज

श्री

| | | |
|---|---|---|
| (१) | श्रीलक्ष्मीकांत | |
| (२) | शाह आलम बाद्शाहगाजी | |
| (३) | ...................... | (आकार वर्तुल. |
| (४) | मुलक जुबदतुला उमरामहा | आठ ओळीतील |
| (५) | राजाधिराज राजराजेश्वर जय | तिसरी ओळ अस्पष्ट |
| (६) | वंतराव होळकर सुबेदारवाला | असून तिच्या शेवटीं |
| (७) | जाह नुसरत जंगबहा | द बहादुर अशीं |
| (८) | दुर | अक्षरें आहेत.) |

तोसीस न लागता येथून बोलून गेला तिकडे जाऊन गुजारा करणे येविसी पुन्हा बोभाट न ये ते करावे नाहीतरी सरकारांत लिहिणे म्हणजे आम्हीच येथून निघून तुम्हाकडे येऊ भाई हा समय नीट नाही हे समजून वर्तनूक करावी रौ छ ७ मोहोरम+ सुा +खमस मयातैन व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

---

ले. ६० जोगळेकर संग्रह } श्री { श. १७०८–१३ इ. १७८६–९१

सु ११८६

याद नवस सुा सीत समानीन————————

सरकारचे——————————

५०००० **वालवलीचे** श्री नारायणास **टिपूचें** पारपत्य होऊन सरकारचा मुलुक किले सरकारात यावे म्हणजे श्रीजवलील तले बाधावयास द्यावे श्रीने मुदत अक्षत्रृतीये पावेतो शत्रु हस्तगत होऊन यश देतो म्हणोन प्रसादहि पाठविला आहे +घडले नाहीं. (१-४-१७८६)

+फाटलेल्यांत दिसतें.

खासगत——————————

पुण्यातलि गणपतीस

१ स्वारीहून पुण्यास गेल्यावर पेढे वाटावें

१ चैत्रशुध्ध पंचमी पावेतो पुण्यास जावें पेढे वाटावें (३-४-१७८६)

२ **फुरसंगीचे** देवीस दर्शनास जावें आणि दोन नवसाचे दोन रुपये पुढे ठेवावे.

+'पो' १ जाला दुसरा फेडला मोहोर ठेविली

---

+ + यामधील अक्षरांत गिरवागिरव आहे. 'बहुत काय ली' हीं अक्षरें लिहून झाल्यावर चूक ध्यानांत आली नंतर लिहिणारानें गिरवून 'सन सुा खम' अशीं अक्षरें काढण्याचें केलें आहे असें दिसतें. पुढें 'स' स्पष्ट व दुसऱ्या ओळींत आल्यानें येथें खमस हेंच वाचन युक्त ठरेल. त्यावरून श. १७२७ चैत्र शु. ९ = इ. १८०५ एप्रिल ८ हा काल येतो.

१२००० श्रीपाडुरंग **पंढरपूर** यास येका वर्षात टिपूचे पारपत्य होऊन सर्व राज्य यावें देवास जडावाचा मुगुट सोन्याचा करून सदरहू किमतीत वाहावा.

+घडले नाही

१ श्रीकृष्णा दक्षणतीरी उतरते समई नवस की **टिपूचे** पारपत्य होऊन सरकारचा मुलुक सरकारांत यावा कृष्णातीरी लक्ष दीप लावावे व शंभर सवासिणी भोजनास घालाव्या

१ नवाब उठोन गेले त्यास गोडी होऊन मसलतीस उपयोगी त्यांचा जमाव राहावा पुण्याचे गणपतीस उसाचे रसाचा माहारुद्र अभिषेक व यक रुपयाचे पेढे वाटावे.

(१) **बादामी** किल्यास मोर्चे वैशाख शुा ३ रविवारी बसविले तेव्हा नवस **शाकांबरी** देवीस +फेडला

१ मंगळवारी किला यावा बाहातर तोळे सोन्यात मुखोटा आणखी आलंकार करून वाहावे

१ नंदादीप एक चालवावा

१ शुक्रवारी यावा रथ नीट करून द्यावा

―
३

१ तहची याद **हरिपंता**कडून कबूल टिपूने केले म्हणौन लिहून आले नंतर वकील माधारा गेला त्यास ठरावाप्रो तह वर्षप्रतिपदे आलिकडे व्हावा पुण्याचे गणपतीस

१ उसाचे रसाचा माहारुद्र अभिषेक

१ येक रुपयाचे पेढे

―
२

१ मुरडा बरा व्हावा ***निघोज्याचें** बहिरोबाचे दर्शनास जाऊन येक मोहोर पुढे ठेवावी

+जाऊन फेडला

२ मुरडा बरा व्हावा म्हणोन दुसऱ्यानी नवस केले

१ **दाजिबा फडके** याणी दुर्वा दाहालक्ष वाहाव्या गणपतीस

१ राजरांजेश्वरास माहारुद्र ब्राह्मणद्वारा करावा म्हणोन **मुकुद जोसी** याणी केला

―
२

१ *तख्तरावा घोडा बा। **भोसले** याचे पोटांत कुरकुरी उठली ती बरी व्हावी **जेजुरीचे खंडोबास** दाहा रुपये पाठवावे

१ ***बादामीचे** हल्याचे दिवसी सारे सरदारास खैर व्हावी रुपयाचे पेढे गणपतीस वाटावें

१ *कान फुटला तो बरा व्हावा **खंडोबा जेजुरीचा** यास ऐक तोळा सोन्याचा कान वाहावा म्हणजे पुढे ठेवावा

कार्तीक[1] वद्य ८ देवाजवल जाऊन सोन्याचा कान पुढे ठेऊन नवस फेडला

सन तिसेन (श. १७११-१२ इ. १७८९-९०)

१ **थेऊरचे** गणपतीस माघ[2] वद्य चतुर्थीपासून येका वर्षात दिवसे दिवस आरोग्य होऊन निशेष रोगानिवृति व्हावी दाहा कोस घोड्यावर बसून गेले असता उपद्रव होऊ नये याप्रो जाल्यास उसाचे रसाचा माहारुद्र अभिषेक ब्राह्मणद्वारा-करावा

---

१ श. १७०७ कार्तिक व. ८ = इ. १७८५ नोवें. २४
२ श. १७११ माघ वद्य ४ = इ. १७९० फेब्रु. ३

किता इह्दिदे तिसैन†

१ **रामजोशी विज्यापूरकर** यांचे विद्यमाने पौष शुा द्वितीयें पावेतो आरोग जाऊन आरोग्य व्हावे दोन हजार रुपये व्यंकटेशास पाठवावें ( ६-१-१७९१ )

इसने तिसैन

१ कार्तीक वद्य तृतियेस वाईनजीक सोनजाई देवीस उद्यापासून रोग बरा व्हावा यक वर्ष पका गुण आला तर दर्शनास यावें ( १३-११-१७९१ )

१ **पर्वतीस** जाता **व्यंकटेश** यास हि सदरहू प्राो रोग बरा व्हावा [1]फालगुन शुा ५ पासून यका वर्षात याप्राो जाल्यावर दोनशें रुपयांची वस्त्रें द्यावी

—

इह्दिदे तिसैन (श.१७१२–१३ इ.१७९०)

१ श्री सिद्धटेकचे गणपतीस माघ[2] शुा ३ पासून येका वर्षांत पुत्र व्हावा प्रथम स्त्रीस पुत्र होऊन बारा दिवस जाल्यावर येक सहस्त्र ब्राह्मण भोजन मोदकाचे सिद्धटेकास करावे

१ **जेजुरीचे** खंडोबास कार्तिक[3] वद्य द्वादसीपासून यका महिन्यांत

१ आर्षरोग जावा सहस्त्र रुपये पुढे ठेवावें

१ शरीर पुष्ट व्हावें च्यार हजार

१ *दाहा रुपये कार्य बोलल्याप्राो जाहाले ते

—

३

**जेजुरी** समक्ष फेडला[1]

† श. १७१२ इ. १७९०

१. १९-२-१७९०

२. ६-२-१७९१

३. ३-१२-१७९०

---

ले. ६१ रायरीकर–संग्रह — श्री — श. इ.

माहाराज——श्री देव स्वामींचे सेवसी

सेवक **बरवाजी** पाटील **ताकपीर** मौजे **चऱ्होवली** ताा हवेली प्राा पुणे साा दंडवत विज्ञापना जे माहाराजानी तीर्थरुपांस पत्र मौजे वाकडचा मजकूर लिहिला त्यास

१ ह्या नवसयादींत कोणकोणते नवस फेडले ते त्या त्या नवसाच्या नोंदीपुढें आडव्या छोट्या ओळींत लिहिलें आहे. तें येथें त्या नोंदीच्या खालीं + ह्या खुणेनें दाखविलें आहे. 'खासगत' बाजूचें नवस नोंदणींत १ च्या खालीं 'रु' असें लिहिलें आहे तेथें * हें चिन्ह घातलें आहे. सर्व याद नानांच्या हातची असून शेरे व रु हि त्यांच्याच हातचें लिहिणें आहे. सन तिसैन, इह्दिदे व इसने तिसैन मधील कांहीं नोंदींत आरंभीच्या १ ह्या आकड्याखालीं लहानशी तिरपी उभी रेघ काढली आहे.

तीर्थरुप पाटील मुखेस लघास राजश्री **बालोजी पलाडे** याजकडे गेले आहेत व राजश्री **खडेराव** पा पुण्यांस आहेत त्यास आपलीं पत्रें रा खडेराव पा त्यांजकडे पुण्यास पाठविली आहेत त्यांकडून जाबसाल येईल तो सेवेसी पाठऊन देऊ विषेस काय लिहिणें रुपालोब करीत आसावें हे विज्ञापना

---

ले. ६२
केळशी-परांजपे

श्री

श. १७२६ अधिक चैत्र शु.४
इ. १८०४ मार्च १५ गुरुवार

० श्री ०
श्रीशितारामचर
णि तत्पर हरिचळा
ळ निरंतर (तीन पदरी मोठी कुचरी शिक्का)

तलावत कौलनामा अजरवारी राजश्री **हरि बलाळ** सुभेदार प्रांत जंजिरे **सुवर्णदुर्ग** तां **जनार्दन गोविंद पराजपे** खोत मौजे **उबरसेत** तां **केलसी** व **राजु गोरीवला** व **धोडजी गोरीवला** सेती मौजे मजकूर सुां आर्बा मर्या तैन व अलफ तुम्हीं सुभांस जंजिरांचे मुकामी येऊन विनंती केली की मौजे मजकुरी पराजपे खारी नजीक खाजण अमोड आहे त्यांत कादली व तिवराची वगैरे झाडे थोर थोर आहेत ते तोडून मूलकंडी खणोन जमीन दर्यागर्क होऊन आतोन मोटे मोटे पल आहेत ते भरावयास व डुंग आहेत ते खणोन पेटाऱ्या लाऊन जमीन साफ करावयास व डोंगराची गोडी माती डोईवोझयानी आणून घालावयास व खाडी किनारा दगडी बाध थोर घालावयाचा व जागां जागां पडसऱ्या बांधोन गोडे पाणी जमिनति ध्यावयास खर्च बहुत लागला व पुडे आणखी खर्च लागणार त्यास खारीचे उमेदीस स्वाम रुपाळु होऊन इतर तालुक्यात वगैरे नख्ती सिरस्ता दर बिघा अडीच तीन रुपये आहेत त्या प्रो कांहीं जाजती ठेवून दर बिघा रुपये ४ च्यार प्रो पुढें माफी इस्तावेयाचा कौल दिल्यास खारीस खर्च लागला आहे व पुढें लाऊन काम मुस्तेद करूं म्हणोन विनंती केल्यावरून जमिनीचें मोजणीस व खर्चाचे अजमासास सरकारांतोन रां **माहादाजी बच्याजी** कारकून पाठविले त्याणी जमिनीची मोजणी व खर्चाचा अजमास करून बखेर पाठविली ते मनास आणून नवबंदिस्त खारीचे कीर्द माहामुरीवर नजर देऊन कौल सादर केला असे कारकुनाची बखेर बि तपसील

---

+ सर्व पत्र चरवाजी पाटील ह्यांच्या हातचें.

सेती जनार्दन गोविंद परांजपे

८३॥ किता जुजवी

४० ३५

८।३। मोहाले खारेपाणी

२७ ६

८१८१। जुजवी

२५ १७

८४॥४॥

यांसी चे:तु:सीमां——

पूर्वेस पराजपे खार १ — दक्षणेस हुरे खार व परांजपे खार १

पश्चमेस खाली कोली नि॥ गोरिवाले १ — उतरेस खाजण खाडी १

यासी खर्च अजमासे रुपये

३०० बाध उतरेकडे दगडी मातीचे

३०० लाची हात

६ रुंदी हात

५ उंची

आकार रुां

७५ दरवाजा चिरेबंदी बाधावयास खर्च रुां

१०० खाजणी रुख तोडावयास व मुलकंडी खणावयास रुां

१२५ पेटाऱ्या लाऊन जमीन साफ करावयास

१२५ वोहल भरावयास व बाध घालावयास रुां

७२५

सेती गोरिवले जुजवी

८१८॥ राजुगोरीवला पराजपे पैकी

५२ ८

८३।१ धोंडजी गोरिवला

६० २२

८४।१॥

यासी चेतु:सीमां——

पूर्वेस नौ चंदिस्त पराजपे खार १ — दक्षणेस हुरेखार व देवसेत १

उतरेस खाडी खाजण १ — पश्चमेस खारी दर्यागर्क १ सोमण १ सोनजी गोरी

२ वला

यासी खर्च अदमासे नख्त रुां

२५० बाध उतरेकडील व पश्चमेकडील

२०० उतरेकडील लाची २०० रुां

५० पश्चमेकडील लाची ३२५ रुां

२५०

२५ दरवाजे यास खर्च

५० झाडे तोडून मूळकंडी खणोन काडावयास

१०० पल भरावयास व जमिन साफ करावयास

५० जमिनीमध्ये बाध घालोन तयार करावयास

४७५

| | जमीन बिघे | खर्च रुपये |
|---|---|---|
| निा जनार्दन गोविंद पराजपे | ८४॥४॥ | ७२५ |
| निा गोरिवले | ८४।१॥ | ४७५ |
| | ८९।१। | १२०० |

येकूण चेतुःसीमां पूर्वक जमीन सवा नऊ बिघें सवापाड यांसी खर्च अजमास नख्त रुपये बारासे लागतील म्हणौन बखैरीत अजमास आहे ऐशास तुम्ही मेहनत व खर्च करून नव साध्य खार तयार करणे लागवडीस आल्यावर सरकारांत येऊन विदित करणे कारकून पाठऊन जमिनीची मोजणी व खर्चाचा अजमास करून आणऊन मेहनत मवाफीक माफी इस्तावेयाचा कौल नख्ती सिरस्ता दर बिघा रुपये ५ पांचप्रमाणें करार करून सादर केला जाईल जलल जाजती होणार नाही कौल असें जाणिजे छ २ माहे जिल्हेज +मोर्तब सूद मोर्तब

सुद (बदामी आकार)

+ बार

---

ले. ६३ केळशी-पराजपे } श्री *गजानन {श. १७३६ श्रावण शु. १२ इ. १८१४ जुलै २९ शुक्रवार

अजस्वारी राजश्री **सदासिव माणकेश्वर** सुभेदार प्रां जंजिरे **सुवर्णदुर्ग** तां **विसाजी बलाल पराजपे खोत** माहाजन मौजे **उबरसेत** तर्फ केलसी खोत मौजे जावलें व मौजे **आबवली** तर्फ वेसवी सुां खमस अशर मयां तैन व अलफ **महमद सलीम** वलद **सेखदाऊद पलवकर** वस्ती पेवे तालुकें अजनवेल हा सदरहू तीन गांव आपलें म्हणोन सालगुदस्तां नवीन वारसा करावयास सुभांस येऊन अर्ज केल्यावर तुम्हांस बलावणें जाहाल्यावरून तुम्ही सुभां जंजिरांचे मुकामी येऊन आपलें वतनदारी-समंध्ये कागदपत्र समजाऊन हकीकत देऊन आपले वृत निवेदन केले व पलवकर यास पुर्सीस करितां तीन गांवचें वतनदारीविसीं साधनसूत्र आपलें जवल नाही जमीदार व वतनदार सडी देतील त्यांत ठरेल त्यास मान्य असों म्हणोन नावनिसीवार सडीदार यांची मान्यता लिहून दिल्ह्यांवरून तुम्हीं हि त्या च सडीदारास मान्य होऊन मान्यता लिहून दिल्ही त्या सडीदार याच्या सङ्या घ्यावयास सरकारातोन रां **बालाजी**

---

+ अक्षर वेगवेगळें. कागदास दोन जोड असून जोडावर 'मोर्तबसुद'चे दोन दोन शिक्के उठविले आहेत. * अक्षर भिन्न.

**कृष्ण** कारकून पाठऊन गांवकरी व भवरगांवचे वतनदार व जमीदार यास श्री लोकेश्वर मौजे **मादिवली** ता केळसी याचे देवालई जमा केले त्याणी सत्योत्तरें सड्या लेहून दिल्ह्यां त्यात पलवकर याचे वतनदारीचा दाखला कांहींच पुरला नाही तीन गाव तुझे कसे ते पुरऊन देणे म्हणोन पलवकर यास ताकीद जाहाली असतां पुरवणी न करितां व सरकार आज्ञा न घेतां गैर हजीर होऊन पळोन गेला सड्यातील सारांष अर्थ पाहातां व तुम्हाजवळ मागील दाखले **आगरे** व **हबसी** व **सरकार** तीही कारकीर्दीतील तुम्हांस सदरहू तीन गांवाविसीं वतनपत्रें सरकारांतोन करून दिल्हीं ती असल वगैरे कागदपत्र पाहून मनास आणितां तीन गांवची खोती बेवारीस सरकारांतोन आगरे याणी तुम्हांस वतन करून दिल्हीं त्यापासून वतनी खोती तुमची खरी तुम्हांस वतन करून दिल्ह्यांपूर्वी बाथेकरी याणी खोती बहुतानी चालविली परंतु त्याची वतनी नव्हे यावरून पलवकरास तीन गावचे वतनासी संबंध नाही याप्रो पंचाईत मतें वाजवीचे रीतीने निवाडा होऊन ठरले यावरून हे पत्र तुम्हांस भोगवटियास सादर केले असें तरी तिन्हीं गांवची खोती जमीनजुमला मानपान झाडमाड सुध्धां पूर्वीपासून तुम्हीं वतन अनभवीत आल्याप्रो तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वौषपरंपरेनें वतनाचा उपभोग करून सरकार दस्ताची उगवणी करून सुखरूप राहाणें पलवकर वगैरे हर कोणास तीन गांवचे वतनाविसीं तुम्हांजवल वारसा करावयास संबंध नाही जाणिजे छ ११ साबान +मोर्तबसुद मोर्तब

सुद (बदामी मुद्रा)

+बार (मार्गे)

---

लें. ६४
चंद्रचूडदप्तर-मुजुमदार

श्रीशंकर

श. १६७७ अ. ज्येष्ठ शु. ३ (?)
इ. १७५५ मे १४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
गंगाधर यशवंत स्वामि गोसावी यासि

पोष्य रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही राव्रो लक्ष्मण पाठविले याणी सविस्तर सांगितले व तुमचेहि पत्र पावले ऐसियासिं आम्हीं तुम्हासाठीच माघारे फिरलो साप्रत मल्हारबाकडे दरमजल येतो परंतु त्याणी आल्याखेरीज × × × रूप राहात नाहीं यास्तव त्याणी तापीतीरास यावे आम्ही येतो भेटी जाहाल्यावरी आम्ही मल्हारबासिवाय तिलभर नाही याप्रमाणे तुम्ही आपले तर्फेने सुभेदाराची खातरजमा करणे साराश आमचे स्वरूप तीर्थरूप राजश्री नानासाहेबापेक्षा आधिकोत्तर बालगावे व आम्ही त्यास वडीलाप्रमाणे समजावे वरकड

---

+ अक्षर वेगळें वेगळें. कागदास एक जोड असून जोडावर मोर्तबसुदचा एकच शिक्का उठविला आहे.

मनसुब्याचा मजकूर तरी जे ते सागतील त्यास कबूल आहो राघो लक्षुमण यास सागितले आहे हे सागतील त्याजवरून कलेल तुम्ही आत:पर लौकर सुभेदारास घेऊन येणे म्हणजे आमचे स्वरूप व पुढे स्वरूप राखतील याची हेच निशा आम्ही तरी राघोबाच्या बोलल्यावरून माघारे फिरलो छ २ साबान बहुत काय लिहिणे हे विनंती साडणी बुधवारी पावली तरी पंचवीस रुपये इनाम देणे हे विनंती*

---

ले. ६५
जोग-केळशी

संकीर्ण पृष्ठ ६४ पहाणें.

---

# पंढरपूर-हरिदास-बडवे

ले. ६६ असल
पंढरपूर-हरिदास

श. १५७९ कार्तिक वद्य ११
इ. १६५७ नवंबर २१

अज माहल उलीया जनाब सिपेहर येहतिजाब ईसमत व ईफत दस्तगाह खिदारत व ताबारत इन्तिबाह बिलिकश अल जमान खतीजे दौरान———दामत ईस्मतहा व-इफतहा बजानेब आमिलानी हाल व इस्तकबाल कसबे मगुर हुमये अमाल किले शाहदुर्ग बिदानद की अज सुा सन तिसा[1] अरबैन अलफ दर्गीविला छ २० माहे सफर फर्मान अशरफ सादिर अस्त के रंगो विठल मुतालिक कृष्णाजी मोबाजी मोकदम कसबे मजकुर बदरगाह माल बारगाह अर्ज नमूद के सरखेली माहल उलिया जनाब सिपेहर येहतिजाब ईसमत व ईफत दस्तगाह खिदारत व ताबारत इन्तिबाह बिलिकश अल जमान खतीजे दौरान———दामत ईस्मतहा व इफतहा व ईजत व रफअत दस्तगाह सादत मा आलिजाह मालिक अजम अकरन मलिक निशात मरहमत शुदा बादज हसन बूर (हदु !) बाज हुदेदार कसबे मजा अरीजा निविस्ते बूद की मोकदम कसबे मजकूर उजर बहारी कर्दा कारबार दिवानि रा खलल मे कुनद हु जो ताकीद बायेदशुद बादहू अज हुजर माहलदार रिकाब रा बराये ताकीद फीरिस्तादा बूदंद बरां कृष्णाजी मोबाजी मजकूर कसबे गुजास्ता रफ्तखुद चंदरोज मोहिमात पटेलगी रवां मे दास्तीम व हुदेदार मजकूर खुद रा निजदस्त कर्दन मे खोस्त अजी वासीते शक जादे शुबा बूद अज कसबे मजा बदर रफ्ता बरमरकूम कसबे गवगवा नमूदा त र सानीदा शुदा बरा अज हुजर खुद व कृष्णाजी मोबाजी रा दस्त नमूदन ज्या बजा फरामीन वाजीब अल इनिबाये शरफ सदूर व इज जहूर याफता अकनून कृष्णाजी मजकूर तोबा करदा

---

* सव पत्र राघोबादादांच्या हातचें आहे.

[1] श. १५७० फाल्गुन वद्य ७ इ. १६४९ फेब्रवारी २३

उम्मेद दर्गाह माल बारगाह दास्ता अस्त नजर इनायेत अर्जानी दास्ता कौल आतिफत फरमुदा· मोकदमी ऊ करार कर्दा पालकी मरहमत नमूदा बदल तैनाती पालकी येक चावर जमीन दर सवाद कसबे मजकूर हम कीर्दि खासा मोकदम इनाम आतिफत फर्मायेद ता शिरणी यक साला मोबलग होन टा १५००८ आा उसूल सी साला कबूल दारम चिनाबरां अजराह मराहीम बेदरगे शाबजा कौल ब कृष्णाजी मोबाजी ईनायेत फरमुदा व खलाअत शाही ममताज व सरफराज साख्ता पटेलगी कसबे मजकूर मोकरर व मुस्तकीम नमूदा पालकी आतिफत साख्ता बदल तैनात पालकी येक चावर जमीन दरसवाद कसबे मजकूर किस्त दाम खासा मोकदम इनाम मरहमत फरमुदा देहानिदा शुदा अस्त मे बायेद की हसबल मस्तूर मोकरर व मुस्तकीम दानिस्ता रवां दारद व जमीन मजकूर दाखिल माहसूल व नकदयाती व बाजे उजुहात दुबाला नुमायेद बादहू अवलाद व अहफदी ऊ जारि साजंद बजा शिरणी येक हजार पांच द होन निशानी टिचकी मजकूर ब माहल मोअजम देहानिदा शुदा अस्त बर मुदती सी साला अज इा साल मजकूर ता सन [1]इहदे खमसैन अलफ उसूल गर्दानिदाब माहल मोअजमा बाँ रसानंद तालिक निविस्ते गिरिफ्ता असलफर्मान बाज देहंद तादानंद बरहुकुम फरमान हुमायून रवंद म्हणवुनु तरी पटेलगी कसबे मजकूर ब कृष्णाजी मोंबाजी बाा फर्मान अशरफ मोकरर केले असे यांचे इनाम व मोऊन पाव विस्वा व पसकी पलगी व बाजे हक लवाजिमा साबिका बाा भोगवटा सालाबाद ताा सालगुदस्ता व बदल तैनाती पालकी येक चावर जमीन सदरहू दरसवाद कसबे मजकूर कीर्दी मोकदम खासा दाखिल माहसूल व नकदयाति व बाजे उजुहात दुंबाला केले असे दुंबाला कीजे बजा शीर्णी येक साला निशानी टिा होन मोबलव १५०० आं उसूल सनतल मजकूर जमा माहल मोअजमा टिचकी होन ५०० जाहले आसे बरहुकुम सरखत माहल मोअजमा मुजरा जाणोनु बाकी होन १००० पेस्तर दर मुदती दुसाला उसूल करून हुजर रवद पाठवुनु दीजे तालिक लेहून घेउनु असल खुर्दखत परतुन दीजे

* तेरीख २४ माहे सफर सन समान खमसैन अलफ

( जोडगिरीवर मुद्रा आहेत. सुरुवातीस अलीफ असून इतर फारसी चार मुद्रा आणि ४१ ओळी फारसी मजकूर आहे. )

---

[1] श. १५७२ = १६५०. * अक्षर निराळें.

**ले. ६७** अस्सल मोडी } श्री { शक १५६३ भाद्रपद वा। १०
बडवे पां. को. } { इ. १६४१ सप्टेंबर १९

(श) के १५६३ वृषानाम संवछरे भाद्रपद वदि दसमी वार अदीतवार तदिनी जाहला महजर ऐसा जे भानभट बीन कृष्णभट कुडोबा चरसे खडलीकर यासी फरोख्त कर्दे कृष्णाई त्रिंबकजी व जगाजोती क्षेत्र पंढरपूर यानी लिहून दिधले ऐसें जे आपला वाडा मिरासीचा होता तो तुम्हास आत्मसंतोषें विकत दिधला असे किमतिव्हन २७ सतावसि त्या ठायाची मर्यादा लांबी गज व रुंदी गज पूर्वेसी बयाजी जगाजोती व पश्चमेस प्रलहाद पाठक बोंचाले उतरेसी उर्भा बीद दक्षणेसी पदमोवा......येणेप्रा ठायांची मर्यादा व सडे करून दिधला आहे देखी ××××× कुडधोडा माती आहे ते ×××××××× ×××× ×××× ला गोत्रज व आणीक कोण्हीं जो उभा राहील त्यास आपण वारुं (तु)म्ही या वाडियावर लेंकराचें लेकरीं सुखरूप नादणें हे अपुले वडिलाचें सुकृत सही चि॥ खंडोजी अपाजी थिटे कुलकर्णि क्षेत्र मजकूर वालि सुमार १३

क्षि जिवाजी अनगलानें सदरहूपैके दोहनी बायेकास बरोबरी दिल्हे

गोही

नरहरि बडवा
× गेशभट दिवटे
(मोडी) अतावा सुहाबनी*
मैंगावा हारिदास
मुरारी हारिदास
(मोडी) बालाजी बडेवा
लिबाजी दीवटा
गोमाजी हारिदास
×× शेटी बापु
×× जी कुभारे
××× त

स्वस्त शंभु डिंगरे
गोवींद पुज्यारे
स्वस्त रंगाजी हारिदास
पुंडलीक हारिदास
माल शेट परदेसी

---

* 'हा' हें अक्षर खोडून त्यावर 'व' हें अक्षर लिहिलें आहे व पुढें 'नीं' आहे. मात्र हा फरक करण्यांत शाई भिन्न आहे.

ले. ६८ अस्सल मोडी पंढरपूर-हरिदास
श. १५९० पौष वद्य ११
इ. १६६९ जाने. १८

अज दिवान ठाणे पा मोहुल तां तरफदारानी व मोकदमानी मौजे सेगौऊ पा मजकूर सुा तिसा सितैन अलफ सन हजार १०७८ मालूम दानद बाो कृस्नाजि मबाजि इनामदार मौजे मजकूर नफर मजकुरास ईनाम चावर दोनी २८० दिधला आहे त्यास हाली नफर मा सनेस घेतला आहे त्याचे सेवेसी सेवक नफर २ बीताा— विठलभट मलहार

सदरहू नफर मा सेवा करीत आहेतो त्याबदल कृस्नाजी मजकुरे इनामतीचा जो हक येईल तो सेवकास देविला आहे त्यावरुनु अम्ही तुम्हास लिहिले आहे तरि इनामतीमधे जो न प टि देखील गला व वनिचराई जे येईल ते नफर मजकुराच्या दुमाला करन तकरार फिरयादी घेऊनु नेदने व कृस्नाजी मबाजीच्या लेकाचा गुमास्ता आहे त्यास इनामतीमधे दखल होऊ नेदने जिराती करुनु असेल व पेसजी खुदखत दिधले आहे ते फिराऊम देने खुर्द खताची तालिक घेऊनु असेल खुदखत फिराऊनु नफर मा देने मोर्तबु

ताा २५ माहे साबानु

---

ले. ६९ अस्सल मोडी पंढरपूर-हरिदास
श्रीव्यंकटेश
श. १६४०
इ. १७१८

अखडित लक्षुमी आलकृत राजमान्ये रा पांडुरंगबावा हरिदास गो यांसी

अज्ञांकित सर्वोत्तम शेशराव नमस्कार उपरि मौजे सेगांव पा मोहळ येथील इनाम चावर दोन २ याची आपली तकसीम व क्षेत्रींचा वाडा हे आपण तुम्हांस दिल्हा असे व सनदा सावकारांपासीं गाहाण होत्या त्या सत्तर ७० रुपये देऊन तुम्हीं सोडविल्या आहेत तरि सदरहू रुपये तुमचे भाऊबंद देतील तरि वांटा घेतील नाहीतर विभागास समध नांही हें लिहून दिल्हे सही व वाडा पडला झडला नीट करीत जाण यासी जे लागत जाईल ते अवघे भाऊ देतील तरीच त्यांस समंध नाही तरी आनेत्रास संमध नाही जाणिजे सके १६०० ४० विलंबी नाम संवछर

गोही

चिकलम छ. ( ओं )

महिमतराव देसपाडे पा महुल

---

ले. ७० अस्सल मोडी } पंढरपूर - चडवे } [1]श्रीव्यंकटेश { श. १५८५ कार्तिक शु. १५ { इ. १६६३ नवंबर ५

श्री चिरजीव राजश्री पाडुरंग व विनायेकास कृष्णाजी मचाजी आसीर्वाद विनंती उपरी सके[2] १५८५ शोभकृत नावं सर्वछर कार्तिक शुध पुर्णमे कार्णे पत्र लिहिलें येसें जें आपण पाडवांची हरिकथा आजीवरी केली याउपरी आपण वृध जालों अशत्कपण दुसरें वाराणसीस चालिलों त्याउपरी आपले प्रतिपदेची कथा तुम्हीं सिष संतान तुम्हांस दिधली तुम्हीं कथा करूनं देवाची आशाढी कार्तिकी करीत जाणें व पहिलें आपण हरिकथा करूं तेव्हां समस्त हरिदास स्नेहेकरी उभे करूं आतां तुम्ही धनी हरिदासां व प्रतिपदेस उभे ठकावया समध नाहीं माझें वंवंशी लेक नातु व पुतणे व पुतण्याचे लेकी तुमचा साभाल करून ठाकेल ते अन देऊन तुम्हावरी स्नेह करितील तो मजवरी उपकार होईल बहुत काय लिहिणे हा आसीर्वाद लेकीचेहि सताने तुम्हास अन देऊन ठाकेल तो सांभाल कर्णे स्वस्त कृष्णाजि मचाजी

साक्षी

विसाजी गोविद ठाणदार
क्षेत्र मजकूर फारसी
शिक्का ( अष्टकोनी )

त्रिंबक गोविद कमाविसदार जात्रा
कार्तिक क्षेत्र मा फारसी
शिक्का

चादो गणपती मुजुमदार
क्षेत्र मजकूर *रुजू

समस्त हरिदासी भिलोनु पाडुरगाचें
गोदाजी देसमुख का कासेगाऊ सा ह

१ ×× बा बडवा
१ सिदोवा ब डवा

विठल यव्हो बडवा
विठोबा ताठे

---

* अक्षर वेगळें.

१ बाळबोध.

२ संवत्सर नांवांपैकीं शुभकृत व शोभन ह्या नांवांत कोठें एकाऐवजीं दुसरें लिहिलेलें आढळतें. तोच प्रकार येथें झालेला आहे. खरे जंत्रींत श. १५८५ ला शोभन हें नांव आहे तर शोभकृत हें श. १५८४ ला दिलेलें आहे. ले. ७० मध्यें वार दिला असता तर शकांक कीं शक नांव खरें हें कळण्यास सहाय्य झालें असतें. शक प्रमाण धरून इ. स. तारीख दिली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| [१]आगाजि भट बे णेराय | [१]विठभट उतपा त | क रून | बाबाजी बहिरव थि टे |
| [१]निरंतर गोपाळ | अऊजी अनगळ | | पाठीसी उभे ठाकोन गो मटे कर्णें हरिदासी स्नेहास अंतर पडों ने-दावे कथेत येईल पैका |

त्यांत धूपदेव माह (?) ला व तेल पाने दिवटी त्यांची बेरीज करून उरेल ते सम ( मागील बाजूस ) स्त हरिदासीं वाटून घेईजे न ये तरी हरिदासी द्यावे स्वस्त कृष्णाजि मवाजी पाडुरगाचा बहुमान दोही कथेस करून संतोषी ठेवावे हा नेम अतावा नरसावा हरिदास व त्याचे बा प भाऊ व विठावा रामाजी हरिदास व ( त्याचे बा ) प भाऊ बैसोन सिवाजी विठलदास व। उधव गोसावीया देखोत नेम केला। तैसे वर्तावे हे लिहल सही

स्वहस्त गोपाल हरिदास
व समस्त ह रिदास
कु हि ळ्या प्रमाण
राजी आस दस्तुर
आतोबा नरसोबा
हरिदास

यमाजी तारे
सिवाजी विट
ळ दास पाडरुगना
नदास

पत्र प्रमाणें सासा
क्षि गणेश उध ( व )
गोसावीं

नीत्यानंदाप्रमाणें व र्त
णें मोकळें केलें अ
से नीत्यानंदा प्रमा
णें
स्वहस्त आतोबा ह
री दास
बा बा नित्या
नंद

[२]कृष्णाजि चे ववशीचे व इस्ट जन व मैत्र व सोयेरे धायेरे जो गोविंदाच्या मुलाचा साभाल करून ठाकल ते देईल ते मज पावेल व

---

२ हा मजकूर कागदाच्या प्रारंभीं श्रीवेंकटाशाच्या बाजूस डोक्याशी तिरपा लिहिला आहे. आणि × हा मजकूर अ पुढें वाचावा.

लें. ६५ } संकीर्ण { श. १७३२
जोग-केळशी } { इ. १८१०

[1]यादि पाहारेबंदी किले रायगड सुा इहिदे अशरे मयातैन व आलफ

१ केलीचा पाा
१ वलणाचा पाा २
१ सदर हिरकणी ३
१ तटबंदी
१ निवाचा पाा
(१ म) हा दरवाजा ५
१ × केचा पाा २
१ चिलखतचा पाा
१ (एक) मकीचा पाा
× सदर राजहुडा ४
१ देवीचा पाा
१ सदर मालची २
१ सदर बाराटके
१ भुजेचा पाा
१ सदर कोंडिखली ५
१ बोहोलाचा पाा
१ सूर्याबुरुज
१ नादगिरीचा पाा
१ श्री सिर्काबाई २
१ श्रीमाहादेव
१ सदर तख्त ५
१ राजवाड्यांतील चौक्या
१ चौकी नाते
१ चौकी नराव
१ चौकी बापणी
१ चौकी कावले घाट
१ वरला टपा २
१ खालेचा टपा २
१ गणेश पाा
१ जावलीचा पाा २
१ मदार ३
१ टाकीचा पाा
१ घलगीचा
१ टपा नाणेदरवाजा
१ खूब लडा ३
१ नाणेदरवजा ५
१ चौकी × ×
१ चौकी तले×र्णी
१ मेट कोठी मागील
१ चिते दरवाजा ३
१ धोडीचा पाा
१ ज्ञ (?) रा पाा
१ नागे बाग
१ मेट म्हशाचे २
× गीर्दनवाई
१ टकमकीचा पाा
१ वागदऱ्याचा पाा
१ खिडीचा पाा
१ धारबीडचा पाा
१ विवल्याचा पाा
१ कलकीचा पाा
१ आब्याचा पाा
१ चौकी क × ×
१ सदर पाा ××
१ चावडीचे मेट २
१ तोफेचे मेट
१ निसणीचे मेट
१ आब्याचे मेट २
१ चौखडीचे मेट
१ जाबलीचे मेट
१ सावताचे मेट २

---

१. भा. इ. सं. मं. त्रै. व. २० अं ३ पृ. १५५-२०० वरील 'रायगड सिंहासनाची व इतर व्यवस्था'- शं. ना. जोशी हा लेख पहा.

## ए. संकीर्ण साहित्य खंड ८

# व्यक्ति-स्थल-नाम सूचि

सूचींतील नांवापुढील आंकडा लेखांकाचा आहे म्हणजे एकच नांव त्या लेखांकांत अधिकदां आलें असेल. म्हणून त्या नांवासाठीं सबंध लेखांक ध्यानीं घेणें अवश्य आहे. क्वचित् एखादा लेखांक अधिक पृष्ठांवर आला असला तर त्यांतील नांवासाठीं लेखांक देऊन उभ्या रेघेपुढें पृष्ठांकहि दिला आहे. सूचींत अं, आं अशी अनुस्वाराची बाराखडी गृहीत धरली असून त्यापुढें व्यंजन जोडाक्षरें दिलीं आहेत. नांवें पाहतांना शिवाजी–सिवाजी, एकनाथ–येकनाथ, वेल्हवड–वेलवंडखोरे इत्यादि जुनीं रूपें असतात, त्या दृष्टीनें नांवें पाहण्याचें करावें. ह्या खंडांत असल मूळ कागदांतुन अधिकाऱ्यांच्या मुद्रा आल्या आहेत. त्या कोणाकोणाच्या हें लक्षांत येण्यासाठीं मुद्रा ह्या नांवाखालीं मुद्राधिकाऱ्यांचीं नांवें वर्णानुक्रमानें दिलीं आहेत.

**—शं. ना. जोशी**

समाप्त

व सभासदांची संख्या वाढावी म्हणूनही आमची सतत खटपट चालू आहे. तींत यश आलें तर प्रकाशनकार्य जास्त वाढवितां येईल.

सध्यां सभासदांस विनंति इतकीच कीं त्यांनीं आपली वर्गणी रुपेनें अंतःस्फूर्तीनें मंडळाकडे नियमित पाठवावी, आपले पत्ते बदलले असल्यास तेहि मंडळाच्या कचेरीकडे पाठवावे, व ज्यांची वर्गणीची थकबाकी आहे तीही रुपया पाठवून देण्याचें करावें. वर्गणी पाठवितांना मात्र खालील गोष्टी अवश्य लक्षांत ठेवाव्यात अशी आग्रहपूर्वक विनंति आहे. ( १ ) हल्लीं पोस्टाचे दर वाढले असल्यानें वर्गणी शक्यतों म. ऑ. नें अगर चेकनें पाठवावी व तीही मुदतींत. ( २ ) वर्गणी चेकनें पाठविल्यास चेकच्या वटाईकरितां **सहा आणे** जादा पाठवावे. ( ३ ) व्ही. पी. करावी हें टपालहंशील वाढल्यानें सोईचें ठरत नाहीं; मनाविरुद्ध आम्हांस वर्गणीवसुलीसाठीं व्ही. पी. करावी लागली तर सभासदांनीं तिचा अवश्य स्वीकार करावा ही **अगत्याची विनंति.**

ह्यापूर्वी मंडळाचा श० १८७४ चा अहवाल, जमाखर्च आणि श. १८७५ चें अंदाजपत्रक मंडळसभासदांकडे पाठविलेंच आहे. त्याचरोबर मंडळसभासद–यादीहि पाठविली आहे. तिचा उपयोग मंडळाच्या कारभारी मंडळाच्या निवडणुकीचे वेळीं होईल. निवडणुकीसंबंधींचें पत्रक लवकरच सभासदांकडे येईल.

नागपंचमी, शके १८७५ **चिटणीस,** भा. इ. सं. मंडळ, पुणें

---

# अनुक्रमणिका



---

श्री. केशव गणेश शारंगपाणी यांनीं आर्यभूषण मुद्रणालय,
घ. नं. ९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४ येथें छापिलें व
श्री. चिं. ग. कर्वे, चिटणीस भा. इ. सं. मंडळ, यांनीं
३१३ अ, सदाशिव पेठ, पुणें २ येथें प्रसिद्ध केलें.

# मंडळाकडे विक्रीस असलेले ग्रंथ

## 4. SELECTIONS FROM THE BOMBAY RECORDS.

No. I Selections from the Bombay Secretariat Records Home Series Vol. I, (Surat letters 1630-1700): (Bombay letters 1677-1742): (Surat Diaries 1660-1781).pp. 450.

No. II Selections from the Bombay Secretariat Records : Home Series Vol. II ( Bombay Diaries 1722-1878 with 7 appendices ) pp. 450

No. III Index to Selections ( Bombay Secretariat Records ), Maratha Series Vol. I part I, II, III, Home Series Vol. I and II.

No. IV Selections from 'Travels and Journals' ( the Bombay Secretariat Records ) pp. 253.

( The whole set of volumes will be sold for Rs. 10 )

म. म. प्रा. द. वा. पोतदार षष्ट्यब्द सन्मान ग्रंथ ( इंग्रजी विभाग पृष्ठें ४००, मराठी विभाग पृष्ठें १८० ) रु. १६-०-०

मराठी रुमाल भाग १ ला ( पृष्ठें २८८ ) रु. ०-१२-०

दत्तोपंत आपटे लेखसंग्रह ( पृष्ठें २८६ ) रु. ५-०-०

दत्तोपंत आपटे स्मारक ग्रंथ ( पृष्ठें २९६ ) रु. ६-०-०

### वा. प्र. मोडक यांचे ग्रंथ

कोल्हापूर राज्याचा इतिहास रु. २-०-०

दक्षिणेंतील मुसलमानी राज्याचा इतिहास रु. २-८-०

बहामनी राज्याचा इतिहास रु. २-०-०

### इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस प्रोसिडिंग्ज

इंडियन हिस्ट्री पुणें अधिवेशन, १९३५ रु. ३-०-०

इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस अधिवेशन, अलाहाबाद, १९३८ रु. ५-०-०

### इतर ग्रंथ

भारतवर्ष वर्ष १ लें, अंक १ व ४ ते १२ ( प्रत्येकीं १ रुपया )

अधिकारयोग-खरेकृत. रु. ०-१०-०

### शिवचरित्र ग्रंथमाला

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ शिवकालीन पत्रसार-संग्रह- | खंड १ | पृ. ३८२ | रु. | ३-८-० |
| २ " " | खंड २ | पृ. ३६६ | " | ३-८-० |
| ३ शिवाजी निबंधावलि- | खंड १ | पृ. ३२५ | " | ३-८-० |
| ४ शिवाजी निबंधावलि- | खंड २ | पृ. १३८ | " | ३-८-० |
| ५ शिवचरित्र निबंधावलि- | खंड ३ | पृ. ४१५ | " | ३-८-० |
| ६ चित्रमय शिवाजी | | | " | १-०-० |
| ७ इंग्लिश रेकॉर्डस ऑन् शिवाजी | | | " | १२-०-० |
| ८ इतिहासाभ्यास-व्याख्यानमाला | | | " | ०-८-० |